# प्रस्तावना

मराठी वाङ्मयाच्या चालू युगाला 'कवितेचें युग' म्हटल्यास तें अगदींच अयथार्थ होणार नाहीं. आजकाल निरनिराळ्या वाङ्मय-प्रकारांची निपज जरी जोरानें होत असली, तरी लघुकथा व तीपेक्षांहि विशेषतः कविता, यांनीं, निर्मिति व प्रगति या बाबतींत खास अघाडी मारली आहे. याचा अर्थ केशवसुतापासून आतांपर्यंत जी कविता निर्माण झाली किंवा होत आहे, ती सर्वच उत्तम आहे असें नाहीं; पण भाषा, विचार व प्रसार या बाबतींत मराठी कविता अधिकाधिक ओजस्वी खास होत चालली आहे. गेल्या चाळीस वर्षांचें अगदीं स्थूल मानानें जरी निरीक्षण केलें तरी देखील प्रत्येक दशकांत कविता पुढेंच सरकली आहे व तिनें नवे नवे प्रांत आक्रमिले आहेत असें आढळून येईल. मराठी भाषेच्या भावी वैभवाच्या दृष्टीनें ही अभिमानाचीच गोष्ट आहे. मराठी काव्याचा होत असलेला हा उत्कर्ष पाहून मनाला क्षणभर समाधान वाटल्याखेरीज रहात नाहीं. परंतु आतां विचार मांडण्यांतील निर्भयता व भाषेची अनुरूपता या बाबतींतच नुसती प्रगति होऊन चालणार नाहीं; त्याबरोबरच मराठीचीं इतर अंगोपांगें-हि जोमदार व सकस बनलीं पाहिजेत व ते दिवस जवळ आले आहेत, हें नवीन नवीन प्रकाशित होत असलेले कवितासंग्रह पाहून वाटूं लागतें.

प्रस्तुत पुढें असलेली "भावलेखा" म्हणजे औंध संस्थानांतील जुन्या-नव्या, वृद्धतरुण, कविकवयित्रींच्या कवितांचा संग्रह होय. औंध संस्थान हें कलेचें माहेरघर आहे. चित्रकला तर तेथें कायमचें ठाणें देऊन बसली आहे. त्याच ठिकाणीं काव्यकलेचा उगम होणें अगदीं साहजिक आहे. आज औंध संस्थानांत कोणत्या दर्जाची कविता निर्माण होत आहे, याचा ही "भावलेखा"

म्हणजे एक प्रातिनिधिक ग्रंथच आहे. ही "भावलेखा" एका शुभ प्रसंगाच्या निमित्तानें उदित होत असल्यामुळें हिच्यामधें आपणांस कांही प्रासंगिक पद्यें दिसतात; त्याचप्रमाणें कांहीं प्रादेशिक कवनेंहि आढळतात. औंध संस्थानच्या बाण्याला अनुसरून म्हणावयाचें म्हणजे, यांतील सर्व माल अस्सल देशी, अगदीं स्वतांच्या प्रांतांत घडविलेला आहे. औंध संस्थानच्या कवींचें एकीकरण या दृष्टीनें ही गोष्ट भूषणावह आहे. शिवाय लेखक जरी प्रादेशिक असले तरी त्यांनीं विषयाच्या दृष्टीनें ठेवलेली दृष्टि निव्वळ प्रादेशिक नाहीं. कविता ही जरी वैयक्तिक असली तरी पुष्कळच वेळां तिची भूमिका व्यापक स्वरूपाची असल्यास ती लौकिकच होते व चांगली ठरते. कवि हा मानव्याचा डोंगर चढूं लागतांच त्याच्या सहानुभूतींचें क्षेत्र व्यापक बनतें व मग त्याच्या दृष्टीला केवळ एखादा प्रांत जरी दिसला, तरी त्यांतूनच त्याला लौकिक सुखदुःखें दिसूं लागतात. 'भावलेखे'तील सर्व कवींनीं ही व्यापक दृष्टि जरी ठेवलेली नसली, तरी परंतु 'गरुडाची तळमळ,' 'अंतरीं वसे कालिमा,' 'चित्रकार,' 'स्फूर्तिदेवतेस,' 'मानधनाची व्याकुलता,' 'गुलाबास' किंवा 'प्रार्थना' यासारख्या कवितांतून ती निःसंशय दिसून येते.

पुष्कळ वेळां तत्त्वज्ञान व काव्य यांतील अंतर आपल्या लक्षांत येत नाहीं व त्यामुळें कविता रसहीन होण्याचा फार संभव असतो. तत्त्वज्ञान व काव्य यांतील सीमारेषा जरी आपणांस दाखवितां आली नाहीं, तरी स्थूल मानानें त्यांच्या प्रकृती निराळ्या आहेत, हें कोणासहि समजून येईल. तत्त्वज्ञान हें सत्यनिष्ठ असल्याने व काव्याला सत्याची आवश्यकता असल्याने काव्य व तत्त्वज्ञान यांची फारकत होणार नाही, हें खरें. परंतु तें कोणत्या स्वरूपांत मांडावयाचें हा प्रश्न महत्त्वाचा असल्याने त्याकडे कानाडोळा झाल्यास कला व रस यांची हानि होते. याचा अर्थ तत्त्वज्ञान हें नीरस असतें व काव्य

हें एकमेव सरस असतें असें नाहीं. तत्त्वज्ञानापेक्षा काव्याला रसवत्तेची अधिक जरुरी असते व म्हणून काव्यामधून ध्वनित होणारें तत्त्वज्ञान अधिक ग्राह्य असतें. शिवाय जी ती गोष्ट ज्या त्या भूमिकेवरच सजून दिसते. ज्याला त्याला स्वस्थानाचें म्हणून कांही एक वैभव असतें. तें सांभाळून केवळ कलात्मकतेनें जेव्हां तो दुसऱ्या भूमिकेचा आश्रय करतो तेव्हांच तो खुलून दिसतो. तत्त्वज्ञानाची भूमिका श्रेष्ठ तर खरीच. परंतु म्हणून तें भलत्याच वेळीं भलत्याच ठिकाणीं, वेळीं अवेळीं किंवा एकसारखें काव्यांतून डोकावूं लागलें तर वाचकाच्या पदरांत शेवटीं रसहीनताच येते. पूर्वापार तत्त्वज्ञानालाच काव्य म्हणण्याची किंवा समजण्याची प्रथा पडल्यानें या बाबतींत नवीन लेखकाचीहि क्वचित् दिशाभूल होते. तत्त्वज्ञानावांचून–म्हणजे सत्यावाचून–काव्य होऊं शकणार नाही हें खरें आहे; परंतु याचा अर्थ तत्त्वज्ञान म्हणजेच काव्य असा मात्र नव्हे. काव्याचे निकष वेगळे आहेत व तत्त्वज्ञानाचे निकष वेगळे आहेत. कल्पनाशक्तीच्या आधारावर निर्माण झालेली स्वप्नमय सुंदर सृष्टि व तदंतर्भूत असलेलें शाश्वत सत्य, ही काव्याची भूमिका असते, तर निव्वळ सत्यप्रतिपादन ही तत्त्व-ज्ञानाची भूमिका असते; एक रोकडें तर दुसरें रंगदार, एक अमूर्त तर दुसरें मूर्त, एक बुद्धिगम्य तर दुसरें भावनागम्य; सारांश तत्त्वज्ञानाच्या ब्रह्मांतून काव्याची माया निर्माण होते. कल्पनासृष्टीच्या या मायेंतून जो शाश्वत सत्याचें व सौंदर्याचें स्वरूप भावकोमलतेनें हृदयाला प्रतीत करतो, तो कवि. कविता लिहिणाऱ्यानें किंवा ती वाचणाऱ्यानें ही भूमिका घेतली कीं काव्य-प्रांतांत सरस कोणतें व नीरस कोणतें हें त्याला तात्काळ कळून येतें.

याचप्रमाणें कवीनें आणखी एक भूमिका लक्षांत घेतली पाहिजे. पुष्कळ वेळां आपण, आपले विचार किंवा आपली भाषा लिहीत नाहीं. श्रवण, मनन, निदिध्यास, वगैरे अनेक गोष्टींनी आपल्या मनास निरनिराळे संस्कार

कळत न कळत झालेले असतात व आपण ते व्यक्त करतांना त्याच्याच भाषेत किंवा त्याच्याच पद्धतीनें करीत असतों. असलें होणारें अनुकरण कधींहि श्रेयस्कारक नसतें; अनुकरण हें नेहमींच दुय्यम दर्जाचें ठरतें. गरुडाच्या पिलाच्या पंखांत जेव्हां खरी शक्ति येते व त्याला अंतराळाचा जेव्हां अदमास येतो, तेव्हां तें आत्मविश्वासानें स्वैर भराऱ्या मारूं लागतें व तो त्याचा विहार त्यालाच काय, पण सर्वांनाच रमवितो. जातिवंत कवीची स्थिति अशीच असते. त्याला त्याचें व्यक्तिमत्व सांपडलेलें असतें व त्याच्या जोरावर तो आपले विचार पृथगात्मतेने मांडूं शकतो. त्याची भाषा, त्याचे विचार, त्याची लेखनशैली हीं सर्व त्याचीं स्वतांचींच असतात. अशी अनुभवांतून उमललेली रससिद्ध कविता रसिकास केव्हांहि आनंदच देईल.

काव्यक्षेत्राचा एकूण व्याप व त्याच्या सर्व मर्यादा निवेदन करण्याचें हें स्थळ नव्हे. तथापि वरील विचारसरणी लक्षांत घेऊन "भावलेखे"चीं पानें चाळूं लागलें असतां बरेंच समाधान वाटतें. वरील मर्यादेबरोबरच, हा काव्यसंग्रह एका रौप्यज्युबिली–निमित्त प्रसिद्ध होत आहे व संपादिका श्रीमंत अक्कासाहेब यांनी कविता संकलित करतांना एक विशिष्ट धोरण पुढें ठेवलें आहे, याहि आनुषंगिक मर्यादा लक्षांत घेणें जरूर आहे.

अगदीं वर वर पहाणाराला देखील या "भावलेखे"मधें आध्यात्मिक, पौराणिक, ऐतिहासिक, आधिभौतिक व प्रासंगिक अशा विविध विषयांवर कवींनीं आपलीं लेखणी चालावेली आहे हें दिसेल. प्रासंगिक कवितेंतहि एक प्रकारचें औचित्य असतें. इतर कवितांची मोजदाद घेतां इतर विषयांपेक्षां आधिभौतिक किंवा ज्याला आपण सांसारिक म्हणूं अशा विषयांनीं "भावलेखे"च्या कवींचीं मनें गुंतविलीं आहेत, ही समाधानाची गोष्ट आहे.

ऐहिक जीवन घालवितांना सूक्ष्म डोळयांना सांसारिक सुखदुःखाचे अनेक प्रसंग दिसतात व लगेच कविहृदयांतील संवेदना जागी होऊन आपल्या अनुभूतीचीं चित्रें रेखाटूं लागते. " भावलेखे " मध्यें अशीं अनेक चित्रें असून त्यांत आपणांस बरीच विविधता आढळेल. आरंभींच आपणांस श्री० कुलकर्णी यांचें " सूर्यस्तोत्र " दिसतें. पुढें श्री० दाढे यांची प्रतिभा वीर व भक्ति या रसांवर अधिष्ठित झालेली दिसते व याचें प्रत्यंतर ' रायगडचें सिंहासन, ' ' गरुडाची तळमळ ' व ' भावतरंग ' या कवितांमधें येतें. श्री० सौ० कमलाबाई वाबळे यांनीं पाकळया गळून जाणाऱ्या ' सुमना 'ला आळवून स्त्रीहृदय व्यक्त केलें आहे. नंतर श्री० सोनूताई काळे यांना, मुलाचें आईवर प्रेम कधीं कधीं कां नसतें, याचें ' एक कोडें ' पडलेलें दिसतें. श्री० आऊताई देशपांडे यांचे अभंग जुन्या वळणाच्या अभंगांची स्मृति करून देतात. श्री० ना० धों० ताम्हणकरांनीं निर्दिष्ट केलेला ' अंतरींचा काळिमा ' मार्मिक आहे. श्री० गोळिवडेकर यांनी ' स्फूर्ति–देवते 'ला आळविलें असून त्यांच्या कलावंत चिरंजिवांनीं आपणांस ' मायभूमीसाठी ' वाटणारी तळमळ सावेश व्यक्त केली आहे, श्री० द० ग० कुलकर्णी यांनीं ' बापूजींच्या उपवासाची ' काळजी वाहून, एका लौकिक भावनेनें आपला आदर व्यक्त केला आहे.

श्रीमंत राजकुमारी अक्कासाहेब यांची कलाकुसरी प्रेक्षणीय व हृद्य आहे मातृप्रेमाची खरी उणीव मातृविहीन कन्येलाच जाणवेल; त्यामुळें त्यांनीं आईला कळवळयानें मारलेली हांक आपले डोळे क्षणभर ओले करते. त्यांनीं ' चित्रकार ' व ' गुलाब ' यांचीं चित्रें सहृदयतेनें काढलीं आहेत. चित्र-काराच्या कुंचलींतलें खरें सौंदर्य चित्रकारालाच समजतें व त्यामुळेंच त्यांनीं चित्रकाराचें चित्र यशस्वी रेखाटलें आहे. त्यांची 'गुलाबास' उद्देशून असलेली

कविता ध्वन्यर्थसूचक असल्यानें ती सुंदर वाटते. कु० मालती किर्लोस्कर यांनी आपल्या दोनच पण वैशिष्ट्यपूर्ण विनोदी कवितांनीं भावलेखेच्या तेजांत सुंदर भर टाकली आहे. त्यांच्या ' माझा उपवास ' व 'जावईबोवा' या कविता कसल्याही गंभीर वृत्तीच्या माणसाच्या मनाला गुदगुल्या केल्याखेरीज राहणार नाहींत. श्री० मोघे यांनीं ' हार्मोनियम व टाइपराय-टर ' या गद्य शीर्षकाखालीं मापलेलें दोहींमधील काव्यमय अंतर त्यांच्या कल्पकतेचें द्योतक आहे; विशेषतः त्याचा शेवट गोड आहे.

श्री० म० भि० कुलकर्णी हे तर काय सुप्रसिद्ध कवि आहेत. त्यांची 'मान-धनाची व्याकुलता' स्वाभिमान दाखविते, तर ' ओझेवाल्याचें ' चित्र आप-णांस आपल्या सांसारिक ओझ्याची जाणीव करून देते. त्यांनीं ' रसिकांची ' केलेली आळवणी त्यांच्या सहृदयतेची साक्ष पटविते. श्री० दाभाडे यांची एकच एक ' कहाणी ' सुंदर वाटते. यापुढें श्री० देशपांडे यांनीं ' कोकिलेस ' पाचारलें आहे, तर श्री० येरगट्टीकर यांनी ' द्रौपदीचा धांवा ' लिहून जुन्या ओवीची स्मृति करून दिली आहे. शेवटीं श्री० शशांक यांनीं रसि-कांस ' सभोंवार ' पहावयास लावून व आपल्या माधुर्यानें 'स्फूर्तिदेवतेस' आळवून, ' शुक्राच्या चांदणीचें ' ' भावदर्शन ' घडविलें आहे. श्री० शशांक यांची भाषा भावकोमल असून रचना सफाइदार असते व नाजुक भावनांचे पदर ते हलक्या हातानें उलगडूं शकतात. त्यांच्या ' शुक्राच्या चांदणी'त कल्पनासौंदर्य असलें तरी तीमधील उत्प्रेक्षांचा मानवी जीविताशीं मेळ न घातल्यानें, त्या अधांतरीं लोंबत पडल्या आहेत. त्यांच्या ' सभोंवार ' व ' भावदर्शन ' या कविता सुंदर आहेत.

अशा रीतीने भावलेखेचें विविध-रंगी स्वरूप असून तिचा शेवट शशांका-च्या तेजांत झालेला आहे. कदाचित् "भावलेखे"मधें लेखेपासून शशांका-पर्यंतच्या तेजाचे सर्व कवि आहेत, हें दाखविण्याचाहि संपादिकेचा आशय

असेल; पण 'भावलेखें'त शशांकाची योजना शेवटीं करण्यांत योजकाची चतुराई दिसून येते.

या काव्यसंग्रहांत दोष नाहींत असें मात्र नाहीं. बऱ्याचशा नवोदित कवींना अजून भाषा, वृत्त, व कला यांचा चांगला परिचय घडलेला नाहीं. त्यांनीं काव्यशास्त्राचा थोडा अधिक व्यासंग करणें जरूर आहे. प्रस्तुत प्रस्तावनेच्या पूर्वभागांत केलेल्या सूचना याच धोरणानें पुढें मांडल्या आहेत. कवींनीं व वाचकांनीं "भावलेखें"तील कविता वाचून त्यांचा पडताळा घ्यावा.

कविता-संग्रहाचें "भावलेखा" हें नांव फार सुंदर असून तें शालीनतेचें व नम्रतेचें द्योतक आहे. ही "भावलेखा" एका शुभ प्रसंगानें प्रकाशित होत आहे. अशा वेळीं श्रीमंतांचें अभिनंदन करण्यांत, श्रीमंत राजकुमार अक्कासाहेब पंत व औंध संस्थानचे इतर कवि-कवयित्री यांनीं माझ्या-सारख्या शेजाऱ्याला केवळ आपलेपणानें सहभागी केलें, याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. शेवटीं औंध संस्थानांतील कवींची प्रतिभा अधिकाधिक तेजस्वी होऊन, या "भावलेखे"ची आकाशगंगा होवो, अशी सदिच्छा या मंगलप्रसंगीं प्रकट करतों.

५ नोव्हेंबर १९३४
पुणें

"गिरीश"



# कृतज्ञता—

'भावलेखा' हातीं धरून सरस्वतीच्या मनोज्ञ मन्दिरांत प्रवेश कर- तांना नवखेपणामुळें माझी थोडी फार बावरल्यासारखी स्थिति झाली आहे. 'प्रथितयश गुरुजनांचा मी उपमर्द तर करीत नाहीं ना?' अशी मला शंका येते. सरस्वतीचा रसिक भक्तगण या भावलेखेकडे सहृदयतेनें पाहील, अशी आशा आहे.

कविवर गिरीश यांनीं भावलेखेला सुन्दर व मार्मिक प्रस्तावना देऊन मला उपकृत केलें आहे. याबद्दल मी त्यांची ऋणी आहें. 'गिरीश' च्या सहवासानें 'भावलेखे' च्या सौन्दर्यांत अधिक भर पडली असल्यास नवल नाहीं!

या संग्रहांतील कवि आणि कवयित्रींनी माझ्या विनंतीप्रमाणें मजकडे कविता पाठवून दिल्या, याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणें, हें माझें कर्तव्य आहे.

वेष्टनावरील मनोरम तिरंगी चित्र काढून दिल्याबद्दल गुरु० शं० गो० देवधर, तसेंच आंतील चित्रांबद्दल रा० शंकरराव किर्लोस्कर व कु० माधव सातवळेकर या सर्वांची मी फार आभारी आहें.

याशिवाय ज्या ज्या हितचिंतकांच्या सहाय्याशिवाय हें पुस्तक आहे या स्वरूपांत प्रकाशित होऊं शकलें नसतें, त्यांचे औपचारिक आभार मानून मोकळें होण्यापेक्षा त्यांच्याविषयीं हार्द अधिक न बोललेलेंच बरें!

कामाची गर्दी असूनही अल्पावधींत पुस्तक सुबक रीतीनें छापून दिल्याबद्दल पंडितजी सातवळेकर व प्रेस-मॅनेजर श्री० वा० धों० गुर्जर यांचे आभार मानणें जरूर आहे.

औन्ध, १५-११-३४ कु० अक्कासाहेब पन्त

# गीतक्रम

भावलेखा





## भाव लेखा

# ‘ सुमनमाला ’

( जाति– मोहिनी )

गुम्फिशी कुणास्तव माला बहुत तूं श्रमोनी ?
विमल भावरम्य सराच्या तटाकीं बसोनी ॥ ध्रु० ॥

तुझ्या मुखाभंवतीं विलसे दिव्य विमल कान्ती
आणि सुमनमाला पसरे गन्ध हा सभोंतीं
तुझें रूप बघुनी भ्रमरा जणू पडे भ्रान्ती
भाससी मला वनदेवी रम्य अशा स्थानीं
गुम्फिसी कुणास्तव माला बहुत तूं श्रमोनी ? १

ईशपदीं अर्पावी ही आस का जिवाला ?
बन्धु सुहृद अथवा गेला विजय मिळविण्याला ?
अर्पुनी कृतार्थचि व्हाया गुम्फितेस माला ?
स्वागतार्थ चाले तव का सिद्धता झटोनी ?
गुम्फिसी कुणास्तव माला बहुत तूं श्रमोनी ? २

× × ×

“ प्रभा दिव्य ज्याची भुवनीं दिपविते जनांला
पुण्यमूर्ति पुरुषासाठी या महोत्सवाला
विविध फुलें मी जमविलीं माळ गुंफण्याला
भक्तियुक्त हृदयानें अन् भावनासुमांनीं
गुम्फितसे ही मी माला बहुपरी श्रमोनी ! ” ३

औंध ३–११–३४.

—कु० अक्कासाहेब पन्त

# चिरं जीवतु अयं भूपः ।

नमस्कृत्याम्ब चरणौ शर्मणे प्रार्थयाम्यहम् ।
'चिरं जीवत्वयं भूपो' जनानां हितकाम्यया ॥ १ ॥

प्रजानां विनयाद्येके राजधर्माः सुपालिताः ।
ईदृशः कर्मयोगी त्वां त्यागेनोपास्यते क्वचित् ॥ २ ॥

नियमः खाद्यपेयेषु, भास्करोपासनं तथा ।
जीवनं व्यसनापेतं, व्याधीनामुपशान्तये ॥ ३ ॥

शुच्याचारवचश्चित्तं, संस्कृतेः परिपालनम् ।
ग्रहणं नव्यभावानां पथ्यं यावद्धवेद्धि तत् ॥ ४ ॥

वासो देश्यं सदा धार्यं, वसूनां वर्धनं तथा ।
उद्यमात्सौख्यमारोग्यं, लभन्तां दुःखमोचनम् ॥ ५ ॥

स्वे स्वे कर्मण्यभिरताः सन्तु मे स-कलाः प्रजाः ।
तथामात्याः समुत्क्रान्त्यै विषयस्येति चिन्तनम् ॥ ६ ॥

एवं कुर्वन्स्वकर्माणि शतायुः पुरुषो भवेत् ।
इत्यार्षं वचनं मातः कथं नु वितथं भवेत् ॥ ७ ॥

—धों० वि० कुलकर्णी

# सूर्य-स्तुति

( वृत्त-उपजाति )

तेजोनिधी-भास्कर-सेवनानें ।
उत्क्रांति पावो मम धी क्रमानें ॥
प्रार्थीत संक्रांति-दिनीं खगा मी ।
पूषा-पदीं पावन कोण नाहीं? ॥ १ ॥

प्रेरी रवे ! दाहक शक्ति आधीं ।
जाळावया पातकराशि देहीं ॥
ही काय-भू शोधुनि मित्रराया !
ओपी सदा जीवन जविना या ॥ २ ॥

सत्तत्व-बोधार्थ हिरण्यगर्भा !
सु-गुप्त-सस्यांकुर वाढवाया ॥
क्रोधाद्यमित्र-तृण-नाश-कार्या ।
उत्साह भानो ! वितरी शुभा या ॥ ३ ॥

हा सूर्य आत्मा स्थिर-जंगमांचा ।
उपास्य आर्यां प्रिय-श्रेय दाता ॥
प्रत्यक्ष देवा ! कृत साक्षि जीवा ।
शिवा पदा प्राणय घेइ सेवा ॥ ४ ॥

-धों० वि० कुलकर्णी

# रायगडचें सिंहासन

( जाति– उद्धव )

सम्राट महाराष्ट्राचा, सिंहासनिं जेव्हा बसला
दुर्दांत काळ यवनांचा, स्वातंत्र्यवीर शिव झाला
गोब्राह्मण प्रतिपाळाया, श्रीसमर्थगुरुचा चेला
हादरले शार्दुल बाके
दिल्लीश मनांतुन वचके
यावनी राज्यही तडके
अशरीरिणि वाणी वदली– ' शककर्ता श्रीशिव झाला ' १

आवळेखा

त्या स्वतंत्र तख्ताखालीं, गडपले दुष्ट सैतान
पोलादी छातीचेही, तळमळे हुतात्मे प्राण
जागवी महाराष्ट्राला स्वातंत्र्यध्वज फडफडुन
अभिषेकसमयिं सद्रेंत
गातात बंदि जयगीत
जन अभीष्ट–चिंतन करित
घोषणा भिडलि आकाशीं– 'शककर्ता श्रीशिव पहिला' २

त्या कडेकपारींतून दुमदुमे नाद 'स्वातंत्र्य'
लंगोट्या मरगठ्ठयांत खेळले बोल 'स्वातंत्र्य'
तख्तांतुन रायगडाच्या पसरले किरण 'स्वातंत्र्य'
हा महाराष्ट्र राखाया
हिंदवी धर्म वाढाया
परदास्य–पाश तोडाया
'अवतरला' वाणी वदली– 'शककर्ता श्रीशिव पहिला' ३

तें स्वातंत्र्याचें तख्त भंगून आज फुटलेलें
स्वर्गांत राजराजेश हें महाराष्ट्र काजळलें
बघतां ते वीर गुलाम शाहीर–हृदय मेलेलें
'शिवराज ! पुन्हां छत्रांत
जमवूनी मावळजात
व्हा रायगडीं अभिषिक्त'
ऐकला नाद नभिं भरला– 'शककर्ता येइल महिला.' ४

ता० १–१–३१ —श्री० ग० दाढे.

## गरुडाची तळमळ

( चाल– मनमोहनसारखी )

गरुड– दास्यांत पिचुन मरणें कां प्राणां पाखडून् ? ॥ ध्रु० ॥
करितांच जरा मुख वरती
दुष्टांच्या हृदयीं भरती
घालिते दुर्बलाभवतीं
थैमान पारतंत्र्याच्या लाटा आदळून् ॥ १ ॥
पोटास दगड बांधूनी
काबाड–कष्ट उपसूनी
जातसे ऊर फाटूनी
आंतडीं पिळुन दुःशब्दा देती हासडून् ॥ २ ॥

सर्वस्व म्हणुन जें अमुचें
हो अनाहूत पण त्याचें
अधिराजे कीं स्वर्गींचे
दिलि सनद गुलामांच्या कां रक्तांनीं लिहून् ॥ ३ ॥

स्वाभिमान सुगुण पसारा
तुडवून पायदळिं सारा
दे नीच गुणांना थारा
स्वार्थानें माणुसकीही गेली बुजबुजून् ॥ ४ ॥

तटतटा तोडुनी बंध
स्वर्गांचे फोडिन बांध
आणुनी सुधेचे कुंभ
निखळीन शृंखला आई, शब्दाला स्मरून् ॥ ५ ॥

देशील अनुज्ञा केव्हां ?
आशीर्वच देशिल जेव्हां
छिसडीन कद्रुसुत-जिव्हा
हे कुटिल अधम छेदाया बाहू ये स्फुरून् ॥ ६ ॥

विनता— जा माझा आशीर्वाद
घे सुधा घुमव जयनाद
क्षणिं तोड शृंखला-बंध
कां टांच घासुनी वाया मरणें तडफडून् ॥ ७ ॥ ?

ता० २१-८-३१ —श्री० ग० दाढे

# दैविकतेचें दडपण

( जाति– जलधारा )

दडपण हें क्रूर तुझें साहुं कुठवरी ?
निखळुन कधिं पडतिल दृढ शृंखला तरी ? ॥ ध्रु० ॥
पूर्विल संस्कार ढिले कधिं न व्हायचे
जखडुन बसतात पुरे, अन्धता रुचे
कर्तृत्वा वाव जगीं तिळभरी नसे
प्रामाणिक जीवनही फोल होतसे
चिवचिवती गोड पिलें अति निरागस
भाळविती मंजुरवें सूर्यतेजस
कल्पना न करवें पारि तेज तें बळें
होरपळुन दग्ध करी पंख कोवळे

न्याय कसा उलट तुझा प्रभुवरा ! तरी
दडपण हें क्रूर तुझें साहुं कुठवरी ? १

न्याय–नीति तुडविति पदिं दीन गांजुनी
सत्तेचा मद शिगेस जाइ पोंचुनी
दैवाचा चुकुन फेर देव कोपला
दुबळ्यांनीं हात कपाळास लाविला
अग्नीवर झेपतांच मरण निश्चिती
परि पतंग वेडावुन फिरुन झेपती
देव काय, धर्म काय, कल्पना वृथा
सत्ताप्रिय दुबळ्यांना सांगती प्रथा
बंदित या धर्मवृत्ति गुदमरे पुरी
दडपण हें क्रूर तुझें साहुं कुठवरी ? २

धर्माचें भय गुलाम दुर्बलास कां ?
सत्तेला सत्य गमे बुजगणें फुका !
पैशाचा चूर धनी उधळिती सुखें
अन्नाविण तडफडती जीव किति भुके
शास्त्रांच्या ज्ञानानें विश्व जिंकिती
अज्ञानीं घोर तमीं दीन तरळती
भोगितात देव अशीं स्वर्गिची सुखें
मानव्या काय म्हणुन होउं पारखे ?
देवांशीं बण्ड करुनि खेचुं संगरीं
दडपण हें क्रूर तुझें साहुं कुठवरी ? ३

ता० २८–११–३३ –श्री० ग० दाढे

# भावतरङ्ग

( छन्द – अभङ्ग )

— १ —

सुंदर फुलोरा देवा, तुजसाठीं बांधीन मी गांठीं निर्माल्य तें
तुजभवतालीं प्रकाशाची फाक खद्योत-चमक पुरे मज
कळसाचा नको मुलामा मोहक तळीचा पाइक होईन मी
दिव्य गायनानें भरूं दे गाभार घेईन लकेर बाहेरून
कृपेचा तुषार स्पर्शूनी जाईल निश्चित चुकेल येरझार

— २ —

तुझ्याच कृपेनें जें जें कांही मज लाभलें तें तुज अर्पियेलें
कृपेचे तुषार शिम्पिले हरिखें त्यांचींच मौक्तिकें गुम्फियेलीं
बऱ्यावाइटाची कशाला रे, चाड करशील गोड, लाज तुज
ज्ञानाची मिरास कुणाला वाहिली? आम्हांला हमाली पुरवली

— ३ —

कशाला धावावें वाथा रानोमाळ? सुनें अंतराळ तुजविण
उदासतां जीव वाटतें भेटावें पाङ्गुळल्या भावें काय करूं?
तप्त सहाऱ्यांत देखतां जिव्हाळ रम्य हिरवळ उमटते
अनंत उपाधी तुडुंबती जीवीं भक्तीच्या अभावीं काय त्यांचें?
क्षण भक्तिभाव वाहतां उतून पापमय मन भारावतें

— ४ —

भावनेचे रङ्ग भरूनी सुरेख जीवनाचा लेख सजविला
कुंचलीची माझ्या परी सजावट रसिक डोळ्यांत भरेच ना
उद्दीपनाविण स्फुल्लिंग तेजस्वी अपसूक व्हावी राख त्याची!
वाहता निर्झर खडकाआडून जाई तवङ्गून कान्ती त्याची
भावाविण माल पडला बाजारीं देवा, तुझ्या दारीं खपेल ना?

— ५ —

माझ्या मनावर तुझें दडपण कांहीं केल्या जाण काढवेना
वाटतें पुसावी अन्तरींची मूर्त परि तुझी कीर्त चिरंजीव
घालितो फुङ्कर विझविण्या दीप दिव्य तुझें रूप मालवेना
तुझ्या साह्याविण चुकेन वाटतें अन्तर ओढतें तुजकडे
दुबळेपणाची वाटतसे खन्त संस्कार अव्यक्त पुसटेना

—श्री० ग० दाढे

# गिरणी-मालकास–

( जाति– केशवकरणी )

मिरासदारी तुम्ही मालका, दुबळ्या जीवावरी
कशाची धुंदी डोळ्यावरी ? ॥ ध्रु० ॥
पोटास दगड बांधून मजुर राबतो
घरिं पोरेंबाळें अर्धपोटिं जगवितो
पण आल्या दिवसा कसातरी गुजरितो
दिवसभऱ्यामधिं कष्टुन रात्रीं पडतो धरणीवरी ।
घोरतो सुखांत त्या अवसरीं ॥ १ ॥
खडबडून् पहाटे उठून दुसऱ्या दिशीं
कामावर जातां चरकुन पडला फशीं
मजुरींत मारिला काट अशा नोटिशी
वणवा भडकुन संप पसरला साऱ्या गिरणींतुनी ।
गुदमरे मजूर त्या दडपणीं ॥ २ ॥
जरि समेट करण्या येति शिष्टमण्डळें
टूरिंग उडविती अन्तर ना कळवळे
मजुरांची सोशिक वृत्ति अतां डळमळे
धनीन आणिक कच्चींबच्चीं रोज उपाशी घरीं
जाळिते चिंता वरचेवरी ॥ ३ ॥
गडगंज पूर्विचा नफा पुरुनि राहिला
बेफिकीर मालक संप जरी लांबला
मजुरांचा प्राणहि त्याचपरी अखडला
प्रतिकाराच्या वाऱ्यानें निर्जीव शिडें फुगविलीं
उतरली धुंदी डोळ्यांतली ॥ ४ ॥

ता० १३-११-३३ — श्री० ग० दाढे

# ढोंगी जग

( आति– मोहिनी )

प्रीतिचें प्रदर्शन वाया दावितां कशाला ?
अंतरीं जिव्हाळा कितिसा ज्ञात हें जगाला ! ॥ ध्रु० ॥
डामडौल आतिथ्याचा सर्वही दिखाऊ
पचवितां कसे पण ढोंगा उगिच करुनि बाऊ ?
लपण्डाव खेळुनि दुबळयां मानितसां भाऊ
ओठिं एक पोटीं एक शिकवितां जगाला !
प्रीतिचें प्रदर्शन वाया दावितां कशाला ? ॥ १ ॥
आणि हाय ! भोळे जीव भाळुनी तुम्हांस
पंचारति ओवाळूनी थाटिती मिरास
देखतां प्रभावळ तुमची थरकती निराश
मायावी बुरख्याखालीं काळिकुट्ट लीला !
प्रीतिचें प्रदर्शन वाया दावितां कशाला ? ॥ २ ॥
कर्तुकी कितीकांच्या हो तुडविल्यांत पायीं
श्वान जिणें अश्वावारी पतकरती कांहीं
गगनचुंबि वाड्याखालीं भुतावळ अशी ही
बुजवुनी सुमंगल आज झुलवितां जगाला !
प्रीतिचें प्रदर्शन वाया दावितां कशाला ? ॥ ३ ॥
गर्जतां दिखाऊ समता परिषदांमधून
आणि तेच बोथटलेलें ओकितां लिखाण
दिशाभूल करितीं पत्रें सत्य विस्मरून
ध्यानमग्न बगळयांनीं या व्यापिलें जगाला !
प्रीतिचें प्रदर्शन वाया दावितां कशाला ? ॥ ४ ॥

ता० १७–११–३२ — श्री० ग० दाढे

# सुमनास--

( जाति– नृपममता )

उद्यानीं सुम फुललेलें ।
पाहुनि मन मोहुन गेलें । त्या क्षणीं ॥
वेणीवर खोवायाला ।
मोह मानसाला झाला । नावरे ॥
जो हात घातला देंठा ।
घातला पाकळ्यांनिं सडा । तेधवां ॥
कुरुपता,
धरी समिपता,
म्हणूनि विषमता,
वाटली जीवा,
म्हणुनी कां त्यजिसी देहा । ना कळे ॥१॥
हळुवार हृदं थोरांचीं ।
परदुःखें दुःखित होतीं । जीं खरीं ॥
हेंच कां फुला, दाखविशी ।
अनुकंपेनें विरघळशी । काय बा ॥
कां खेद वाटला चित्ता ।
त्यजितांना लतिकामाता? । ना कळे ॥
कां आंस,
प्रभूचरणांस,
करुनिया स्पर्श,
देह टाकावा,
नैराश्यें त्यजिसा देहा । काय बा ॥ २ ॥

–सौ० कमलाबाई वाबळे

# वाढदिवसानिमित्त

( वृत्त – चामर )

लाभला सुदीन खास तोष जाहला जनीं ।
हिंदभूमि तोषली अहा सुपुत्र पाहुनी. ॥
गंधयुक्त शोभती फुलें रसीक मोहिती ।
प्रेमयुक्त भूप तेवि स्वप्रजेस मोहिती ॥
धन्यवाद तोषिता प्रजा जयास देतसे ।
धन्य तेचि मान ज्यास थोर लाभला असे ॥
वाढवावया स्वदेशप्रेम जीव तळमळे ।
प्रार्थिती जनां आरोग्य वाढवावया त्वरें ॥
भक्तिमान नीतिमान गर्वहीनहृदय जे ।
यांस रक्षिण्या सदैव अंबिका उभी असे ॥
जागण्या प्रजाहितास दक्ष जे महीपती ।
श्रेष्ठता तशीच योग्य लाभली तयाप्रति ॥
सद्गुणी जनास मूर्तिमंत स्फूर्तिचा झरा ।
सुशीलसद्गुणें जगांत – शोभतो – जणू हिरा ॥
संततीहि संपदाहि सौख्यकारि होउं दे ।
मागुं वंदुनी प्रभूस कीर्ति आयु वाढुं दे ॥

– सौ० कमलाबाई वाबळे

# एक कोडें

( जाति- मोहिनी )

गूढ हेंच उकलुनि दावा आज मन्मनाला ।
मूढ बापडी ही माया, हीन कुणी बोला ॥ ध्रु० ॥
रक्त मांस वेचुनि सारें वाढविलें ज्याला ।
करिं स्कांधिं खेळविलें हो सौख्य द्यावयाला ।
तृषाक्षुधा विसरुनि केलें नित्य पालनाला ।
चाललें तया भेटाया जीव हा भुकेला ॥ १ ॥

खेळ खेळण्यासी द्यावे नित नवे मजेचे ।
घेउनि ज्या आनंदानें बाल मुदें नाचे ।
बालभाव बघतां विसरे दुःख गरीबीचें ।
एकवार पाहूं दे ना हृदयविसाव्याला ॥ २ ॥

अंतरींचे कढ आवरले बाळ सुखी व्हावा ।
शोकसागरीं बुडतांही आवरली माया ।
विरहानल भडके झाली दग्ध जरी काया ।
घालुनिया थोरांपदरीं चढविलें पठ्ठाला ॥ ३ ॥

" बांधिली शिदोरी राळेभात रांधियेला ।
कानवला हुरडा ताजा भाजुनी आणीला ।
डकडहंडि राताळ्याची गोड छकूल्याला ।
आवडते भरवूं दे ना बाळभूक त्याला ॥ ४ ॥

गोड गोड खरवस खासा लाडक्या बगीचा ।
खोंड बन्या सजला आला सणहि पोवळ्याचा ।
झूल चांदण्याची झळके, नाद घुंगुराचा ।
रमवि फार सोन्या चढवे एक एक वेळा ॥ ५ ॥

लई ब्येस कुडतें शिवलें लाल बुटेदार ।
शिरिं शोभे मुंडासें हें पदर सोक फार ।
डोरलें विकोनि आणिलें, बाळ मला प्यार ।
तयाविणें पदरीं सांगा झाकुं मी कुणाला ? " ॥ ६ ॥

भेटीस्तव माता दारीं दीनवदन ठेली ।
पाहतां तयासी धांवे, दृष्टि अचल झाली ।
धिःकारुनि जातां वाहे अश्रुमाळ गालीं ।
माय काय श्रीमंताची भिकारीण बोला ? ॥ ७ ॥

—श्री० सोनुताई काळे

# स्वप्नसृष्टींतील आभास

( जाति – उद्धव )

जग तिमिराच्छादित झालें, अंधारी नयना येई
कटुभाव स्वार्थ कंटक हे, विखुरलेचि ठायी ठायीं
भावना सुकोमल सुकल्या, मागमूस कोठें नाहीं
पसरलें धुकें चौफेर
सुटुं पाहे मनिंचा धीर
नयनांतुन वाहे नीर
शमवाया तप्त जिवाला, राजमार्ग एकचि उरला ॥ १ ॥
चालला प्रवास कराया, प्रेमाचा जीव भुकेला
वन अफाट अन् घनदाट, थरकांप अंतरीं झाला
श्रांत देह अवघा थकला, तकवा तो सोडुनि गेला
आशेनें मानस भरलें
दुर्दैव वाटलें सरलें
सावरोनि तोला धरिलें
ममतेनें अंकीं घेई, भूमाय करी अंगाई ॥ २ ॥
अंकावर भूदेवीच्या, सुखनिद्राभेट जहाली
श्रम सुदूर झाला सारा, मानसा हुशारी आली
हृदयांत बहर सौख्याचा, आनंद नाचतो गालीं
दाविलें दृश्य तें गोड
पुरविलें मनाचें कोड
लाविले जिवाला वेड
आशेचा उदय जहाला, अंतरीं फुलोरा फुलला ॥ ३ ॥

किलकिले करुनिया डोळे,        क्षितिजावरि पाहूं जातां
सृष्टिदेवि सुंदर चमके,        नृत्य करी कोमल वनिता
लाजवी स्वतेजें सूर्या,        मृदु हास्य मुखीं शुभचरिता
हळुहळु पदकमलें उचली
आश्वासुनि बोले बोली
सौख्यानें दुनिया भरली
नांव नसे नैराश्याला,        धीर दे माय जगताला ॥ ४ ॥

खेळण्या खेळ मायेचे,        कीं जादूगारिण आली
सारुनि पट दावित लीला,        मोहनास्त्र सोडी खालीं
आनंद सौख्य अन् शांती,        बाळें हीं हातीं धरिलीं
भाग्यवती माता जणु ही
सुखसरिता प्रेमाची ही
मन गुंगुनि तत्पदिं राही
जन भुले नजरबंदीला,        एक-रूप मानव बनला ॥ ५ ॥

तीं छकुलीं बाळें तीन,        वागडतीं स्वच्छंदानें
आनंद बगीचा फुलला,        विरसलीं मधुरसुखसुमनें
तेथें कवि-मधुरकर विहरे,        जन्मलीं सुमंगल कवनें
कुणि रसिका देई मोद
कुणि भोगी सौख्यास्वाद
शांतता कुणा निःशब्द
लाभतां जीव हा धाला,        पावलें दुःख विलयाला ॥ ६ ॥

आनंद रजनिमातेच्या, करिं शोभे छान छकुकडें
कोमला करांगुलि देई, सौख्यास वदे 'येइ गडे!'
धरुनिया पदर आईचा, शांतता–चांदणी ओढे
कर्तव्य मंगळापाशीं
गरु देई सौख्य जनासी
शांति–ध्रुव अढळ आकाशीं
हें निसर्ग कुतुहल पाहे, तारका पुंज वदताहे ॥ ७ ॥

भूजननी जलदेवी ही, पाहतां वंदिली भावें
ही हिमाद्रिकन्या संगें, दुडदुडा बालिका धांवे
भेटतां सौख्य–सिंधूला, आनंद हृदयिं हेलावे
ते प्रशांत कवि निर्झरणी
प्रतिभा काव्याची राणी
वाहतांचि होय शिराणी
द्वैतभाव विलया जाई, सुखसंगम शोभादायी ॥ ८ ॥

रामराय सुखदा मूर्ती, लाभेल सत्य मार्गानें
आनंदरूप श्रीकृष्ण, जोडेल शुद्ध प्रेमानें
मंगला शिवा ही शांती, पूजितां जनां सन्मानें
आदि माय ही चिच्छक्ती
प्रारब्धसूत्र घे हातीं
भुलविते जनां दिनरातीं
गूढ–ओळखी त्या देई आनंद सौख्य शांती ही ॥ ९ ॥

—श्री० सोनूताई काळे

# आळवणी

( जाति– अभङ्ग )

॥ १ ॥

गाईन गाईन गोड तूझें नाम । देई मज प्रेम चरणाचें ।
धरुनिया आशा आलें मी शरण । कां न हो प्रसन्न मन तूझें ? ॥
अज्ञानपटल कैसें मी झुगारूं । नका अंत पाहूं देवराया !
सज्जन–संगत सदा सहवास । धरुनिया ध्यास वाट पाहे ।

॥ २ ॥

गेला जरी तोल सावरीन फांसा । तोड प्रेमपाशा मायबापा ! ।
लागूं दे रे छन्द तुझा वेळोवेळां । गोविंदा! गोपाळा! माधवा रे! ॥
अमोल हें प्रेम ठेविलें हृदयीं । सर्व तुझे पायीं अर्पियेलें ।
शुद्ध या प्रेमाची जोड काय सांगूं । ब्रह्मानंदीं रंगूं तुझे पायीं ॥

॥ ३ ॥

भवसागरीं या बुडतसे नौका । मंगलनायका ! तारी आतां ।
मति माझी मंद नेत्रीं न ये ध्यान । तव पदीं लीन कैसी होऊं ? ॥
रस हे सुंदर देखिलें नयनीं । कधीं चक्रपाणी ! भेटशील ?
अज्ञान लेंकरूं चुकी झाली जरी । सांभाळी श्रीहरी! दीनानाथा ! ॥

॥ ४ ॥

घोर अंधकारीं नेत्र उघडले । परि ना पाऊलें उमगलीं ।
सुषुप्ति सांडूनि झालें मी जागृत । नाहीं अविकृत उमजलें ॥
काळाची जांचणी सोडीव सोडीव । तोडीव तोडीव प्रेमपाशा ।
निःसंग होऊनी केला तुझा धावा । घेऊं दे विसावा पायांपाशीं ॥

॥ ५ ॥

कामक्रोध यांनीं साधियेला दावा । अच्युता! माधवा! काय करूं? ।
व्यर्थ अहंकार मज बुडवील । कोण सोडवील तूजवीण? ॥

लाऊनिया लोभ पुरें फसविलें। व्यर्थ मी मोहिलें बहिरंगा।
कळुनिया सारें गुंतलेपें मन। नाहीं देहभान काय करूं ? ॥

॥ ६ ॥

जगाचा नियंता कसाही मोकली। काय चुकी झाली सांगा बापा!
मागणें मागतें हेंच एक देवा!। देई नित्य सेवा गोड तुझी ॥
सावळें सुंदर देखुनिया रूप। झालें आत्मसूख निज देहीं।
रूप मनोहर पाहोनी भुललें। तव पदीं आलें रमावरा! ॥

॥ ७ ॥

जवळीं असोनी कसें न ये दृष्टी। होतसे रे कष्टी मन माझें।
पश्चात्तापें देवा! होऊं देत शुद्ध। नको होऊं क्रुद्ध दीनावरी ॥
जड या देहाची करूनीया होळी। आलें ना जवळी रामचंद्रा!।
प्रेमाचिये पोटीं झाली जरी खोडी। माता नच सोडी लेकरासी! ॥

॥ ८ ॥

अमोल आयुष्य आतां कसें वेचूं। प्रेमभरें नाचूं तुझ्या छंदें।
संसृतिपसारा झुगारोनि येतां। हो कृतकृत्यता तुझे पायीं ॥
प्रेमाचा ओलावा हृदयीं वसूं दे। चित्त हें रंगूं दे तुझे रंगीं।
विवेक करोनी आलें तव पदीं। कशाला मागुती जावें आतां ॥

॥ ९ ॥

जग हें कोपलें कोण वारी मातें। साह्य व्हावें सुतें देवकीच्या।
मति माझी मंद बुद्धि अल्प देवा!। किति करूं धावा जीव तुटे ॥
मन होते स्वैर मज ना आवरे। घेई धाव त्वरें मायबापा!।
चुकलें मी खरी आतां कां मोकली?। तुजवीण वाली कोण आहे?।

॥१०॥

'राम राम' म्हणुनी गातां गोड गीत। होई सहज हित गुरुराया!।
विषय–वासनें भुलोनी पडलें। परी विसरलें मूळ रूपा ॥

तुझेंच लेंकरूं येई तुजपाशीं। साह्य तरी त्यासी तूंच एक।
मन हें चंचल लागेचना ठाव। वेगीं घेई धाव गुरुराया! ॥

॥११॥

कळो येती मज माझे गुणदोष। होऊं दे कृपेस पात्र आतां।
देखीतां चरण झालें समाधान। गेलें विसरून देहभान ॥
नाशिवंत देह मज फसविलें। व्यर्थ मी मोहिलें मोहपाशीं।
आठवितां ध्यान लागेल समाधी। तुटेल उपाधी आपोआप ॥

॥१२॥

षड्रिपु अघोर गांजितात फार। कुठवरी धीर धरावा हो।
नाहीं मी मोकळी मज मी बांधीलें। व्यर्थ आंचवलें चरणांसी ॥
प्रपंचभोंवरीं फिरे गरगरा। ज्ञान हाच हिरा गमावला।
देह–इमारत कोण नांदे आंत। जाणीव निश्चीत नाहीं त्याची ॥

॥१३॥

सार–असार हे तरंग ऊठती। सर्व मावळती क्षणामाजी।
क्रोध–संतापाचें तुफान सुटलें। दुर्वृत्ती दाटले मेघ मनीं ॥
संकल्प–विकल्प लाटा हेलावती। वेगें आदळती मनोतीरीं।
मद–मत्सराचें सुटलें वादळ। कृपेचा वेल्हाळ रामनाथ ॥

॥ १४ ॥

नाव–सुविचार घातलीसे डोहीं। नेई पैलथडीं माधवा रे!।
सद्‌गुरू–कृपेचा मंत्र संजीवनी। लाभतांचि हानी दुष्कृताची ॥
शुद्ध मनामाजी बीज हें पेरीलें। जीवन घातलें विवेकाचें।
निवृत्तीची जोड तरू हे फुलले। तुज मी वाहिले पुष्पभार ॥
हृदय-कोंदणीं जडविली मूर्ती। जन्म–मृत्यु–भीती चुकलीसे
सद् गुरू–साधनें स्थिती पालटली। वृत्ती आनंदली काय सांगूं?।

– श्री० आऊताई देशपांडे

## औंध-युवकास-

( चाल- राधेकृष्ण बोल० )

ऊठ वीर औंध-युवका ! ।
सुप्रभातिं बोल । वंदे मातरम् अमोल ॥ ध्रु० ॥

पंत वीर थोर महात्मा ।
औंध-भूमिचा जो आत्मा ।
बोधितो तुम्हांसि आतां । सुप्रभातिं बोल ॥ १ ॥

वापरुनी वस्त्र विदेशी ।
कां विटाळिशी देहासी ।
शुद्ध माल घे स्वदेशी । मंत्र हाचि बोल ।
वंदे मातरम् अमोल ॥ २ ॥

—सौ० इंदिराबाई कणबूर

# प्रभूची कृपा

( वृत्त– भुजंगप्रयात )

“ नसे द्रव्य हातीं, छळे रोगराई ।
  जगीं मान कीर्ती मिळेना कदाही ॥
नको जीव झाला, मला तार आतां ।
  प्रभो ! सौख्य द्यावें दयेनें अनाथा. ” ॥ १ ॥

+ + +

अशी प्रार्थना ऐकुनी ईश्वराला ।
  दया ना तयाची, परी रोष आला ॥
तयाला पुढें पाहुनी देव बोले ।
  “ दिलें मी तयाचें तुवां काय केलें ? ॥ २ ॥

" कळावें तुला इष्ट किंवा अनिष्ट ।
    हिताचा कळावा तुला मार्ग स्पष्ट ॥
म्हणोनी दिली बुद्धिची संपदा मी ।
    परी तूं तिला लाविसी निंद्य कामीं ! ॥ ३ ॥

" जया ठेवितां शुद्ध, हो मोददायी ।
    स्वतांला, जगाला, मलाही सदाही ॥
मनाची अशा देणगी जी तुला मी ।
    दिली तूं परी लाविसी निंद्य कामीं ! ॥ ४ ॥

" जयामाजिं सामर्थ्य नाना परीचें ।
    असे विक्रमाचे, तसे संपदेचे ॥
दिले कल्पवृक्षापरी हात तूला ।
    तयांचा वदे फायदा काय केला ? ॥ ५ ॥

" वदावें सदा सत्य आणीक गोड ।
    म्हणोनी दिली मी मुखाचीहि जोड ॥
परी दुर्वचें बोलुनी तूं जगाला ।
    स्वतांला तसा ताप निर्माण केला ! ॥ ६ ॥

" अमोलीक हीं साधनें सौख्यपूर्ण ।
    वृथा नाशुनी सेविसी दुःख पूर्ण ॥
दिलेलें परी सार्थकीं लावि जो ना ।
    प्रभूची कृपा त्या नसे पामरांना ! " ॥ ७ ॥

—ना० धों० ताम्हणकर.

# अन्तरीं वसे परी काळिमा !

( जाति- केशवकरणी )

सुधाधवल पूर्णिमा शोभवी चोहिकडे चन्द्रमा ।
अंतरीं वसे परी काळिमा ॥

साधीभोळी निशासुंदरी पाहुनि तो हर्षला ।
प्रीतिची हूल दावुं लागला ॥

करीं तिच्या कर घालुनि विहरे, तन्मय तो जाहला ।
जाहलें सार्थक वाटे तिला ॥

पूर्णिमामहोत्सव करुनि परी साजरा ।
मुख वळवी हळु हळु दूर दूर जाहला ।
ती उदास आवस अखेर आली तिला ॥

कपट करी प्रतिदिनीं निशेशीं वरुनि पाक चन्द्रमा ।
अन्तरी वसे परी काळिमा ॥

—ना० धों० ताम्हणकर

# मनोराज्य

( जाति—चन्द्रकान्त )

परमेशाचा अंश असें मी सत्य मला गमतें ।
इच्छामात्रें निर्मुनि सृष्टी मन तेथें रमतें ॥

बागबगीचे सुंदर मंदिर दास सिद्ध सेवे ।
स्फटिकांचे जलसंचय कमळें पहात बैसावें ॥

गायन, वादन, नृत्य युवति-जनकंठ मधुर व्हावें ।
मनिं येतांची सर्व सज्ज तें न्यून न कधिं ठावें ॥

खाद्य पेय जें इच्छित समयीं सुपात्रिं वाढावें ।
सुवेष धरुनी कोमल हस्तीं घ्याया विनवावें ॥

गोपाळयावर बसुनी रचुनी गाणें मी गावें ।
प्रियजन ऐकुनि हर्षभरानें गुंगुनि डोलावें ॥

अंगीं पराक्रम बळें धराया शार्दुलासि धावें ।
कान धरोनी पंजरिं त्याला आणुनि कोंडावें ॥

गगनीं भरारी विनपंखानें घेउनिया यावें ।
अगाध सागरिं बुडथा घेउनी मोती काढावे ॥

आकाशामधिं अधांतरीं मी वाडे बांधावे ।
सिंधूमध्ये भिजे न ऐसे तंबू ठोकावे ॥

पशुपक्ष्यांशीं भाषण करितां स्नेह वाढवावें ।
शक्ति सर्व ही ईशांशानें मिळते मज ठावें ॥

कृतज्ञतेनें सन्निध त्यांच्या पायीं बैसावें ।
सर्व शक्ति तो चिंतुनि मानसिं प्रेमें त्या ध्यावें ॥

सर्वव्यापी तत्त्व एक तें अन्य मी न व्हावें ।
एकत्वानें विलीन होउनि भानहि हरपावें ॥

बुद्धिकल्पना मनुजा दिधली मुख्य अंश देवें ।
मनोमंदिरीं बसवुनि त्यासचि पूजावें भावें ॥

म्हणोत कोणी मनोराज्य हें फुकट खेद पावे ।
स्वाधिन परि हा उपाय सोपा समाधिच्या नांवें ॥

—ना० वि० गोलिवडेकर

# स्फूर्तिदेवते !

स्फूर्तिदेवते ! नमन, न तुज, रुचते गमतें ॥ध्रु०॥

वंदिति प्रार्थिति बहु पारि जरि तें
कविवर तरि ना तव मन धातें
खेचिन आतां म्हणतों ह्यातें
उठशि लगबगा धांवशि पुढतें ॥१॥

तव उदरींची सुता चेटकी
मधुर बोल कीं कविता बटकी
रूप मनोहर चाल नेटकी
गाउनि सकलां मंदिरिं हटकी
स्तोम अशानें तव रसिकांतें ॥२॥

तोंड दाविशी वेळिं अवेळीं
तुझी प्रीतिची रीत वेगळी
साहेना तुज निद्रा जवळी
तिजसि लोटितां होशि निराळी ॥३॥

चंचल वृत्ती तुझी बघोनी
नाद टाकिला तव कितिकांनीं
ज्ञात न त्यां कीं धरितां कानीं
येशिल वदाशिल गोड कहाणी ॥४॥

चढविसि कोपें भिवया वरतीं
अधिकचि शोभे तनुची कांती
पाहुनि तव ही उलटी रीती
कुरवाळाया वाटे प्रीती
हास्य प्रगट गालीं दिसतें ॥५॥

—ना० वि० गोलिवडेकर

# अस्तकाल

हा कां तो चंडरश्मी ? प्रखरतर जनां तापवी जो स्वतेजें
शंका येते बघोनी सुखदकिरण कां चंद्रिका ही विराजे
भीती टाकोनि सारे जन तुज नयनीं रोखुनी बोलती हे
जातां सत्ता प्रतापी पुरपति बनती दीन हें सत्य आहे १

दावीना तोंड लोकां धुरकट पडदा द्वारिं सोडोनि राहे
घेई लज्जा प्रतीची बघुनि निजपती दीनकांती घरा ये
बोले नाथालि रागें, कुवच गृहिणिचें ऐकतां लाल झाला
तेव्हां ना हो तमाशा म्हणुनि निजकरीं ओढिलें आंत त्याला २

झाला प्रतापगडही रविसा उदासी
देई परंतु पहिली स्मृति शौर्यराशी
तोफा जणों सुटुनिया भरल्या धुरांनीं
दाही दिशा ज्वलित गोल नभीं शिरोनी ३

आहे शोभा रवीची नयनसुखकरा अस्तसानीं पहाया
बॉंबे-पॉईंट-भागीं जमति जन बहू शीगही घालवाया
काढावें चित्र इच्छा उपजत कुशला चित्रकारा प्रभूला ।
गेलों त्यांच्या सवें मी गणुनि भलि असे संधि ही आपणाला ४

फलकीं रंग घालोनी प्रभूंनीं चित्र काढिलें
अक्षरें रचिलीं म्यां हीं गुह्य तें येथ फोडिलें ५

—ना० वि० गोलिवडेकर

# मायभूमिसाठीं

( जाति– केशवकरणी )

सत्य–पाळनीं तृणसम जीवित मानुनि करूं कीर्तिला
उद्धरूं आज मायभूमिला

सरळ घृत्तिचा कित्ता घालुनि बोधूं इतरां जनां
नसावें कपट मनीं सज्जना

शौर्य धैर्य या क्षात्र गुणांनीं रक्षूं निजभूमिला
कापवूं अरिसी रणिं चळचळा

कर्तव्य–दक्षता स्वकर्मिं नित दाखवूं
शीतोष्ण साहुनी कठिण तनू वागवूं
मिळवुनी ज्ञान–विज्ञान यश गाजवूं

सत्य गुणांनीं मायभूमि गे ! उन्नति देऊं तुला
देई तूं आम्हां विपुल स्थला १

—नर-नारायण

# अर्पण-पत्रिका

( जाति– बालमुकुन्द )

हें कुसुम तुझ्याविण अर्पूं दुसऱ्या कुणा? ॥ ध्रु० ॥

तूं असखि येथुनी कोस शेंकडों दुरी
दृष्टीस दिसेना मूर्त तुझी गोजिरी
परि चित्र तुझें या कायम ठसलें उरीं
मनिं क्षणोक्षणीं । स्मरण देउनी। हालविते भावना १

असतात पितर ना स्वर्लोकीं आपुले?
जल अन्न अर्पिती भूवर त्यांना भले
वा त्रिदळ शिवाला पिंडीवरचें मिळे
म्हणुनि येथुनी । काव्य अर्पुनी । तुजला पोंचेल ना? २

कवि करुनि भिकारी काव्याचें चोपडें
पळतसे अर्पिण्या प्रभुच्या पायाकडे
तें पाहुनि पडतें देवाला सांकडें
भार वाउगा । लादणें उगा । न पटे माझ्या मना ३

मी नव्हतों पूर्वी कीटक काव्यांतिल
हें जीवित होतें सुखदायक मंगल
कां पेटविला तूं पोटीं वडवानल ?
बोचते उरीं । ती जरी सुरी । उपसाया येइना ४

तव स्मरणाची जों ओल मुळाशीं मिळे
मम स्फूर्तिलतेला तोंवर येतिल फुलें
गत स्नेहाचें गे, स्मारक तीं आपुलें
हिंडलों जरी । मी दिगन्तरीं । देतिल मज प्रेरणा ५

ही रानफुलांची रास तुला जी दिसे
ती गुंफणार मी माळी केवळ असे
स्वीकारशील ना प्रेमानें राजसे ?
जगिं हसो कुणी । दोप काढुनी । धुडकाविन तत्क्षणां ६

—द० ग० कुलकर्णी

# चल फीर गडे, माघारीं !

( जाति – उद्धव )

जाईची कोमल लतिका, तारुण्यें मुसमुसलेली
ऋतु वसंत येतां उमले, तिजवरती कलिका पहिली
विस्तीर्ण वृक्ष आम्राचा, वर माया पांखर घाली
अनुरूप बनविली जोड
देवानें कीं बिनतोड
तिळभर न सांपडे खोड
हें दृश्य विरल संसारीं, चल फीर गडे, माघारीं १

तुडवून काजवे पायीं, रोंखणें नभावर नयन
धुडकावुन निर्झर दारीं, मृगजळीं लावणें ध्यान
सोडून हातचे पळतीं, पळत्याच्या मागें प्राण
जवळीच फुले निवडुंग
फुललेलें त्याचें अंग
बघण्यांत होय ती दंग
हर्षेली अंतरीं भारी, चल फीर गडे, माघारीं २

## भावलेखा

गवताळ गालिच्या खालीं, माखला सख्यांनी माळ
रम्य वृक्ष–राजी–पोटीं, फिरती किति पशु विक्राळ
जो स्नेह दाखवी वरुनी, तो ठरे अखेरिस काळ

बाह्यांग पाहतां प्रीती
ओढणें जनांची रीती
फसवणूक होते अंतीं

हें सत्य जाण संसारीं, चल फीर गडे, माघारीं ३

त्या हिरव्या देहावरती, काट्यांची भरली रास
आरक्त फळावर वाढे, सलगारी बारिक कूस
हा दुर्जन समजुनि दुरुनी, टाकिती सुजन सहवास

विस्तीर्ण परी हा चूत
किति छाया याची शीत
खग लक्ष पोटिं बसतात

वेचितो तनू उपकारीं, चल फीर गडे माघारीं ४

मधु आम्र मंजिरीसंग, मिसळतां तुझा मकरंद
दूरच्याहि पांथस्थांना, देशील किती आनंद
स्वातंत्र्य वागडायाला, लाभेल इथें स्वच्छंद

अविचार क्षणाचा करुन
पडशील होउनी दीन
आणुनी ध्यानिं हें पूर्ण

निर्धार करी हितकारी, चल फीर गडे, माघारीं ५

औन्ध १०–११–३१. —द० ग० कुलकर्णी

# ये धांवत माते !

[ वृत्त– भिल्लीणदिडकी ]

कोणावरतीं मी लटकें हाय रुसावें
अन् गालिं हंसावें !
मी मातृसुखा आंचवलें, व्याकुळ होतें
ये धांवत माते ! १
निर्व्याज नि निःस्वार्थ तुझें प्रेम वधूनी
ये ऊर भरोनी
भेटी अणि पाजीव मला प्रेमसुधेतें
ये धांवत माते ! २
चारा भरवूनी चिमणी रोज पिलांतें
पोटीं बिलगीते
मी हाय ! उपाशी नच ये प्रेम कुणातें
ये धांवत माते ! ३
ही वानरि जाई नित घेऊनि पिलाला
मोदें फिरण्याला

हातें धरुनी कोण अतां नेइल मातें
ये धांवत माते ! ४

अंकावरतीं मस्तक ठेऊन रहावें
तेथेंच निजावें
हें भाग्य जगीं या मज वांट्यास न येतें
ये धांवत माते ! ५

घाळोनि गळां हात कुशीं गाढ निजावें
सौख्यांत रमावें
वाटे मजला, पोळुनिया अंतर जातें
ये धांवत माते ! ६

सारी धरणी ही रजनी व्यापुनि राही
कां झोप न येई
प्रेमें मज बाहून हळू थोपटण्यातें
ये धांवत माते ! ७

आक्रोश करोनी बहु तूतें अठवोनी
येते मज ग्लानी
ना गोड वचें सान्त्वन कोणीहि करिते
ये धांवत माते ! ८

झोपेंत कधीं भेसुरसें स्वप्न पडावें
दचकून उठावें
दुर्भाग्य परी ना मिळतें मातृकुशीतें
ये धांवत माते ! ९

येशील पुन्हा धावुनि पोटीं मज घ्याया
अन् शान्त कराया
आशेवर या जीवित मी कंठित होतें
ये धांवत माते ! १०

माते, तव वात्सल्य किती ? ते दिन साचे
स्वर्गीय सुखाचे
ना ते नशिबीं, घे मिटुनी मी नयनातें
ये धांवत माते ! ११

कोणी मजला अर्पि जरी राज्यसुखाला
किंवा यशमाला
अंकास्तव त्या बेशक लाथाडिन त्यातें
ये धांवत माते ! १२

स्वार्थी जगतीं दुष्ट किती तापद होती
कैसे छळिताती
हा जाच किती साहुं, अतां, या समयातें
ये धांवत माते ! १३

होतांच स्मृती जागृत काळीज थरारी
छे: बाण विखारी
स्वर्गी इथुनी घेउनि जा दीन मुलीतें
ये धांवत माते ! १४

ता०— ६ - १० - ३३ ---कु० अक्कासाहेब पंत

# चित्रकार

( जाति- मोहिनी )

खरा भाग्यवान जगीं तूं गमसि चित्रकारा !
सदा तुझा हेवा करितो जीव मम बिचारा ध्रु०
जगीं दुःख बघतां सारें चित्त हो विषण्ण
जीवनासभोंतीं पसरे निराशा-पुलीन
चित्र रेखितांना दिससी परी तूं प्रसन्न
विसरुनिया जाशी तूं हा जगाचा पसारा
खरा भाग्यवान जगीं तूं गमसि चित्रकारा ! १
हृदयपटीं उमटे जेव्हा चित्र निसर्गाचें
सौख्य तदा अनुभविशी तूं पूर्ण समाधीचें
रेखितां बहू कौशल्यें तेंच चित्र साचें
स्वैर करी नृत्य शलाका, स्रवत सुधाधारा
खरा भाग्यवान जगीं तूं गमसि चित्रकारा ! २
चित्र पूर्ण होतां तुज जो हर्ष मनीं होई
तसा कधीं सम्राटाच्या नशीबीं न येई
वृत्ति तुझी तन्मय तेव्हां होउनिया जाई
दुःखदायि कुविचारांना नसे मुळीं थारा
खरा भाग्यवान जगीं तूं गमसि चित्रकारा ! ३
रम्य कल्पना तव चाले किती स्वैरतेनें
भाव नवोनव रंगविशी बहू कुशलतेनें
उकलिशी समाजाचे तूं बन्ध वर्तिकेनें
धन्य तूं कलाकृति तव ही धन्य हो उदारा !
खरा भाग्यवान जगीं तूं गमसि चित्रकारा !! ४

औंध १५-२-३३ —कु० अक्कासाहेब पन्त

# अन्तरींची आग

( जाति– दिण्डी )

' मला खाऊ दे भूक फार लागे
　　कण्ठ सुकला बघ जीव वहू भागे '
बालकाचे येतांच बोल कानीं
　　येति अश्रूंनीं लोचनें भरुनी　　१

' कुठें होतें मी आज कुठें आहें ? '
　　दिवस पूर्वींचे आठवून पाहे
असे पूर्वी प्रासाद राहण्याला
　　आज नाहीं आधार बालकाला　　२

' बसलें मी तें कनककोन्दणांत
　　दैवयोगानें आज परि वनांत
युगें शान्तीचे आणि सुखाचे ते
　　दिवस आठवुनी हृदय भरुनि येतें　　३

अन्नपूर्णा मी, असें धनिक–जाया
परी बाळाला आज नसे खाया
दयाघन तो निष्ठूर कसा होय
वक्रदृष्टी मजवरी करी होय ! ४

क्रूर दैवानें घात असा केला
किती देऊं मी बोल नशीबाला
स्थिती दुक्खद बहु, मार्ग काढण्याला
दिसेना आशादीप लोचनाला ५

दिवस सौख्याचे हाय निघुन गेले
जहर दुक्खहि वांट्यास आज आलें
तीव्र दुक्ख किती हृदय मम विदारी
प्रभूराया, तुजविणें कोण तारी ? ’

× × ×

‘ ऊठ कीं गऽ अं आइ ! असें काय ? ’
शब्द बाळाचे ऐकतांच माय
होय जागृत, ये भान तयें वेळा
धरुनि पोटीं चुम्बिलें बालकाला ७

‘ पूर्व जन्मीं मी काय पाप केलें ?
आज वाळ्याला दुक्ख म्हणुनि आलें
कशी साहूं मी तीव्र यातनेला ?
कोण येइल कां आग विझविण्याला ? ’ ८

औंध, ऑक्टोबर ३४ — कु० अक्कासाहेब पन्त

# माझा उपास

( जाति– शूर्पणखा )

उपास मज लागला
  सखे बाई उपास मज लागला ॥ ध्रु० ॥
कांहींच नसे खायला
केळीं नि खजुर आणिला
अखेर दूध प्यायला । सखे बाई ॥ १ ॥

खारका मोजक्या दहा
उकडिले बटाटे सहा
खिस नुसता केला पहा । सखे बाई ॥ २ ॥

वाडगा भरुन लापशी
घेतली पहा गोडशी
वरि खाउनि खिचडी तशी । सखे बाई ॥ ३ ॥

हा उपास मज भोवला
घाबरा जीव जाहला
दहिभात म्हणुनि चापला । सखे बाई ॥ ४ ॥

–कु० मालती किर्लोस्कर

# जावईबोवा

( आदि-अंजनी )

मजेंत चाले लग्नसोहळा
मेजवानिचा थाट चालला
उद्बत्त्यांचा वास कोंदला । चोहिंकडे तेव्हां ॥ १ ॥

आप्तइष्टादिक सर्व मंडळी
व्याही विहिणी जमली सगळी
पाटावरतीं येउनि बसली । सोळें नेसोनी ॥ २ ॥

उठेनात परि जावईबोवा
त्यांना कसला आला रुसवा
कांहीं कळेना कोणा तेव्हां । झालें काय असें ॥ ३ ॥

म्हणति सासरे ' घड्याळ देतों
फेटा किंवा रुमाल देतों
सांगा जिन्नस काय हवा तो । देतों आणोनी ' ॥ ४ ॥

जावईबोवा खुषींत आले
सासऱ्यास ते हर्षें वदले
'तपकिरिची मज रुचि या वेळीं । द्यावी आणोनी' ॥ ५ ॥

—कु० मालती किर्लोस्कर

# हार्मोनियम आणि टाइपरायटर

( जाति–स्वर्गगंङगा )

करांगुलीच्या आघातानें चाले दोघांचें काज ।
साम्यभेद परि दोघांमधले बघतां वाटतसे मौज ॥

खळबळ करि जग एकसारखें परी संगमीं रंगांची ।
विभिन्नता जशि पूर्ण दिसे त्या गंगा-यमुना-ओघांची ॥

तशीच चटपट एकसारखी चाले यांची वेगाची ।
'टप टप' 'सारीगमपधनीसा' भाषा ही त्या दोघांची ॥

तज्ज्ञ कुशल जन ते जरि यांच्या अभ्यासें मोदें जगती ।
भिन्न परी परिणाम घडे कीं त्यांच्या कृतिचा या जगतीं ॥

\+ \+ \+

पांढऱ्यावरी काळें करणें एकच बाणा हा यांचा ।
टांक लेखणी मरति उपाशी धंदा बुडवी हा त्यांचा ॥
पोस्टमन् जसा पत्रें वाटीं समभावें सुखदुःखांचीं ।
तसाच हा निःसंग बनोनी गर्दी उडवी लेखांची ॥
स्वयंप्रेरणा नाहीं; नाहीं भल्याबुऱ्याची क्षिति याला ।
चालक जैसा चालवील या सिद्ध तसा चालायाला ॥

× × ×

काळे किंवा सूर पांढरे मधुर सुकोमल गानरवें ।
रसिक मनातें मोहित करिती भाव उपजविति हृदयिं नवे ॥
विषण्ण चित्ता शांत कराया त्रस्त मनातें रमवाया ।
स्वरसंमेलन समर्थ आहे इचें बहु जनां रमवाया ॥
रागरागिण्या सुखदुःखांच्या परी मोहिती गुंगविती ।
नादलुब्धता विसरवि जगता श्रवणसुखीं मति रंगविती ॥
खेदें मोदें हृदय भरूनिया सुदीर्घ श्वासोच्छ्वास करी ।
जणू भावना उचंबळति कीं इच्याहि हृदयीं युवतिपरी ॥
लेखक मोठा कीं गायक हा अप्रबुद्धतेचा प्रश्न ।
गीता सांगे, वेणू वाजवि, योग्य कोणतें करि कृष्ण ? ॥
सर्व चांगलें आपल्यापरी कुणी भावना फुलवीती ।
कुणी बुद्धिला खुलवीती; परि दोघेही जग झुलवीती ॥

किर्लोस्करवाडी, फेब्रुवारी–१९३३. -रा० ग० मोघे

# नवी कविता

( वृत्त–वसंततिलका )

पाहूनिया कवि अशा भर कल्पनांना
येतो, तसेचि मनिं येति विकल्प नाना
झाले प्रसंग–पवनें जल झुळझुराचें
जाती विचार करितां दिन वत्सराचे १

लाभावया सुकवि–कीर्ति करूं प्रयत्न
काढूं विचार–जलधींतुनि काव्यरत्न
ऐसे मनीं सतत ये, करंटाच आतां
निंदास्तुती न गणितां हरि सिद्धिदाता २

योजीन दिव्य उपमा नव कल्पनाही
घालीन चालहि नवी नव शब्द तेही
ओतीन स्वर्गसुख त्या नव गोड काव्यीं
जे डोलवी सुरसिकास हृयात भावी ३

ऐसें मनीं धरुनि काव्य नवें कराया
सायंदिनीं निघत मी विजनीं फिराया
केला विचार बहु आणि हताश झालों
आता गृहीं लिहुं म्हणोनि गृहास आलों ४

गेहीं बसोनि लिहितों तव भोंवताली
आलीं मुलें, शिशुसुखीं मति गुंग झाली
वाटे तदा मजसि मी किति भाग्यशाली
उत्साह ये मज नवा मम वृत्ति धाली ५

काढूं लिहून सहजीं नव काव्य आतां
मी निश्चया करित तों स्मितवक्त्र कांता
पाचारुनी मधुर भोजन शब्द गोड
देई अशी गुणवती नित सौख्य गोड ६

तांबूल घेउनि प्रियामन तोषवूनी
मी बैसलों नविन काव्य रचूं म्हणूनी
तों बालमित्र मज मारित हांक आला
गप्पाविनोदिं न कळे किती काळ गेला ७

थोडें तरी लिहुंच जांभइ ये तरीही
या निश्चयें झटुनिया बसलोंच मीही
केले खराब कपटे बहु कागदाचे
झालें न लेखन परी कविता–पदाचें ८

तों बोलवीत निजण्यासि कुमारि; "आर्या!
सोसेल जागरण काय?" पुशीत भार्या
ना ये जुळोनि कविता मन खिन्न झालें
काव्यासवें कवियशःसुखही निमालें! ९

किर्लोस्करवाडी, नोव्हेंबर १९२६. —रा० ग० मोघे

# जगदीशवंदन

[ राग– पिलु जंगला. ताल धुमाळी. ]

( चाल– परशवता पाश दैवें )

जगदीशा! नमन तुजला तारी दीनवत्सला ॥ध्रु०॥

अभय भास्करा तूं निरसी
कृष्ण भयतमाला १

न्याय्य मार्ग मज दावाया
दीप हो दयाळा ! २

पापशीत थरकापवितें
ने तया लयाला ३

—म० भि० कुलकर्णी.

# रसिकास–

( राग–केदार )

हें गीत तुझ्यास्तव रसिका ! न दुज्यासाठीं
सोडून अरसिकां तुझ्या लागलों पाठीं

गुंफिला हार हा तुला शब्दसुमनांचा
रसहीना अर्पुनि नाहीं सुकवायाचा

जरि भीड ओढते मागें रोधी गतिला
धावतां चुकवितों दुष्ट काळतोंडीला

अवधान तुझें मज असें लाखमोलाचें
मज नकोचि नाटक मान डुलविणारांचें

तूं नकोस काढूं शब्द एकही स्तुतिचा
आसवें उभीं तव ठाव घ्यावया मनिंचा

करपवील नीरस माया जेव्हां मजला
हीं तुझीं आंसवें पडतील उपयोगाला

रागाव निखालस घे टीकेची काठी
सोडून अरसिकां तुझ्या लागलों पाठीं

–म० भि० कुलकर्णी

# मानधनाची व्याकुलता

( राग – मांड )

मी हात कुणाला दीनपणानें जोडूं ?
 प्रिय मानधनावर उदक कशाला सोडूं ?

हे हात न होतीं पुढें फार थरथरती
 मुखजडता येई दीन शब्द नच निघती

अंजली कशी तरी करावयाला जावी
 ती मदासवांनी मात्र अपाप भरावी

ही मान कशी वाकवूं कळेना मजला
 करुं काय न येई तसें वळण अंगाला

का बोट दाविशी परक्याच्या सदनाचें
 कटु अनुभव झाले पुरे कृपणहृदयांचे

तूं दाता माझा याचक मी तव व्हावें
 एवढें मागणें दयामया ! पुरवावें

'द्या' असा तुझ्याविण शब्द वृथा कां दवडूं ?
 प्रिय मानधनावर उदक कशाला सोडूं ?

—म० भि० कुलकर्णी

# ओझेंवाला

(राग – असावरी)

हें ओझें अवजड किती शिरावर वाहूं ?
हा असाच रखडत चालत कुठवर राहूं ?

'घ्या हात जरासा कोणी उतरायाला'
तोडून जीव मी सांगितलें सकलांला

फिरके न एकही हुकडे माझ्यासाठीं
टोंचून बोलती उलट फिरविती पाठी

देऊन आरोळ्या कंठ कोरडा झाला
शब्दांचा मिणमिण दिवा तोहि मालवला

मानेचे माझ्या आतां पडतिल तुकडे
तूं तरी दयाळा ! पाहशील कां इकडे ?

पडणार धरेवर देह तुला आळवितां
अवमान कुणाचा तुझा तूंच बघ आतां ?

—म० भि० कुलकर्णी

# आळवणी

(छन्द – अभङ्ग)

– १ –

तारुण्यसंभ्रमीं चुकलों मी वाट। कुठें मागूं दाद याच्यापुढें ?
प्रेमळपणाचा पाहिजे ओलावा। चुकलेल्या जीवा निरंतर
नाहीं तरी स्वैर भडकेल तारूं। कोण तया वारूं शकणार ?
संसृतीचा पाश तुटोनिया गेला। जीव अर्धमेला झाला माझा
आतां तरि देवा! दाखवावी दया। नातरी हा वाया जीव जाई

– २ –

मायामोहजालीं कर्तव्या मुकलों। व्यर्थ पस्तावलों देवराया !
जीवनकलिका पडे पायधूळीं। तया कोण वाली तुजवीण ?
नश्वर जिवाला नको ही जाचणी। देवा! चक्रपाणी! साहवेना
अजाणपणांत नको तें रे झालें। न म्हणे आपुलें मज कोणी
प्रक्षुब्ध हा जीव हात द्यावा देवा!। पतिताची सेवा घ्यावी आतां

— ३ —

दुर्दम निराशा जाळिते मनाला । आशेचा जिव्हाळा मावळला
असत्याचें सारें नसतें बा, झालें । जीवन भङ्गलें कायमचें
मुका मार आतां मना सोसवेना । अशीच का दैना जन्मभरी
प्रेमाचे अङ्कूर अंतरीं जळाले । शून्यमय झालें जग सारें
आतां हाच मार्ग दाखवावा देवा! । घडो नित्य सेवा चरणांची

— ४ —

सुखाच्या आशेनें मार्गभ्रष्ट झालों । चुकूनी पावलों आडमार्गी
आशामृगजळीं व्यर्थ हेलावलों । व्यामोहीं गुंतलों स्वैरपणीं
आतां झालों जागा विषय सुटेना । आस ही तुटेना अन्तरींची
मनाच्या विरुद्ध जीव आंखे मार्ग । दुर्जनसंसर्ग घडतसे
स्वप्नमय जग वाटे मज आतां । तुजवीण त्राता नाहीं कोणी

— ५ —

विश्रांतला जीव बहुता उपाधी । कासया ही व्याधी प्रपंचाची
माझें मज नको कशाला दुज्याचें । साम्राज्य स्वार्थाचें विरामलें
निवांत गाऊं दे अद्वैत–संगीत । वृत्ती ब्रह्मीभूत होऊनीया
शून्याचा संकेत शून्यमय आहे । उत्पत्तितत्त्व हें मज ठावें
निस्वान्त जीवाची हीच आळवणी । प्रभूच्या चरणीं लीन व्हावें

— ६ —

ओशाळला जीव अंतरीं निराशा । करपली आशा पूर्णपणें
हृदय ओतुनी अश्रुसुमावली । निःश्वासें गुंफिली तुजसाठीं
शून्यहृदयांचा बेबंद वेव्हार । सर्व शून्याकार व्यवहारीं
आतां एक तूंच मजसी आसरा । धावा विश्वंभरा ! दीनासाठीं

–दत्त गोविंद

# विशालबागेंतील कोकिला

( जाति – चन्द्रकान्त )

प्रासादाच्या पश्चिमभागीं विशाल बागेंतुन
कुहु कुहु ऐशी येइ लकेरी मन टाकी मोहुन १

वनदेवी जणु वाटे छेडी सतार घेऊन
रागरागिणी आळविते कीं, प्रभुला गाऊन २

रौप्य– महोत्सव दिन प्रभूचा येवो उदयाला
अशी प्रार्थना करी कोकिला! गाउनि ईशाला ३

म्हणे नृपाला "दयासागरा तुम्ही दीन बंधू
झाला म्हणुनी पामर आम्ही त्वत्पादां वंदू ४

कीर्ति–सुगंधा तुमच्या मोहुनि आलें उद्यानीं
गमला मातें नृपा तुम्ही हो सुगुणरत्नखाणी ५

मधुर गोडशीं फळें खाउनी आपुल्या बागेंत
क्रमितों दिन नित खेळुनि आम्ही बहु आनंदांत." ६

गा बाई गे! कोकिलबाई! दिव्य तुझीं गाणीं
सांद्र सुशीतल घन वृक्षांच्या छाये बैसूनी ७

–ह० श्री० येरगट्टीकर

# उत्साह

(जाति– भूपतिवैभव)

खेळती बालपणिं लीलेनें शिशु खेळ
उत्साहें हर्षद करिती अवघा काळ

कुठलेंहि कार्य तूं करी तसें लीलेने
हें भाग्यसूत्र तूं शिशुपासुनि या शिकणें

घनतिमिरहि पाहुनि रविमनिं ये नच भीती
रविपरी सदा तव उजळो कृतिची ज्योती

वर्षतो मेघ वा तपतो प्रखर उन्हाळा
हा काल जगावर निसर्ग--नियमें ठरला

कधिं निसर्गनियम न शक्त कुणी बदलाया
तद्नुसार जीवा लागतसे वागया

आचरण तुझेंही तसेंच अचल असावें
जें नियत जाहलें तें न तुवां बदलावें

विश्वजात अवघें बघ लागे श्रमण्याला
जें ध्येय आपुलें तें जागें मिळवायाला

आदर्शहि धुंडी उज्ज्वलसा ही सृष्टी
त्या चरितीं भ्रमते भू जणु सूर्याभ वतीं
तव तेंवि घडावें ध्येयार्जन बहु यत्नें
सहज लब्ध कांचा न घे, श्रमें घे रत्नें
दिव्यता म्हणुनि तुज परिश्रमाने लाभे
शिकवितो चराचर भूगोलहि पण ' राबे! '
जरि काल पळभरी उद्यमविरहित गेला
गांजील पुन्हा तो काल बनुनि ग्रहमाला
उद्यमें जोडतें सौख्य, हरतसें दैन्य
सुख हेंचि,ठेवणें सर्व ठायिं दाक्षिण्य!
उगवती वेलिवर सुमनें हासत बघ तीं
मुखिं हास्य प्रफुल्लित सदासर्वदा वरिती
त्यापरी असावी प्रमुदित नित मुख-कांती
वरि अविरत हृदयीं रत्नाकरसम शांती
तव हृदीं भरो बहु उत्साहाचा सिंधू
घन नैराश्येंही न सरो लव तद्बिंदू
उगवल्यापासुनी रवि जो मावळताहे
दरबार सृष्टिचा गाइ असें उत्साहें—
" पथ आक्रमि नूतन पथिका! न फिरे मागें
युक्ति शक्ति धरुनी करी पदार्पण वेगें! "

—वा० न० महाडिक

# अर्पण-पत्रिका

( वृत्त- शार्दूलविक्रीडित )

विद्या, श्री चपला, अहा ! उभयतां येथें मुदें नांदती
विद्या न्याय सुधारणा जन पहा, प्रेमें क्रमें लाधती
राजा थोर, प्रजा तशी, उभयतां आदर्श हो आगळे
आहे भाग्य भवानराव नृपती औंधास कीं लाधले १

ज्यांनीं घालुनि ती तनू कमविली, सूर्या नमस्कार ते
केली तीच प्रथा स्वयें पटवुनी साऱ्या जनां वंद्य ते
व्यायामीं रत हे, जनांस गुरुसे दृष्टीपुढें जाहले ।
आहे भाग्य भवानराव नृपती औंधास कीं लाधले २

ज्यांचें लालन प्रेमलें करित श्री देवी यमाई सदा
काळाचें भय ना शिवे, मग कशी तेथें ठरे आपदा
दीर्घायुष्य तुम्हा मिळो ! तव करीं राहो सदा संपदा
ऐसें चिंतन सर्वथैव करिते, प्रार्थी प्रजा श्रीपदा ३

आम्ही लेकरु ही प्रजा प्रभु तुम्ही आम्हां खरी माउली
केलें रंजन आमुचेशिशुपरी, आहे कृपासाउली
मातेचे उपकार काय फिटणें, कांहींतरी योजुनी
केलें अर्पण कौतुकें प्रभुपदीं, घ्यावें बरें मानुनी ४

--स० द० लेले

# आर्यार्थ आर्या

काव्यप्रतिभे ! सुंदरि ! ऊठ पहा हाक मारिते कोण ।
कृष्णाकुमारि अक्का मुद्रित संदेश देइ परतोन ॥ १ ॥

काव्यप्रतिभा सुंदरि ! वाचाळा कविस करिशि अजि मूक ।
वर्णन अवर्णनीयहि कवितेची भागवूं कशी भूक ? ॥ २ ॥

तृप्ति न होतां यावा ढेकर खोटा जसाचि तृप्तीचा ।
औंधेश-गुण गणाया मार्गहि तैसाचि काव्यक्लृप्तीचा ॥३॥

गुणगणन आयुगणनहि अगणित राहो सदाचि पंतांचें ।
आयुर्वित्तादिक हे गुपितच राहे विचारवंतांचें ॥ ४ ॥

परमेश्वर विसरवितों जें राजैश्वर्य त्यांत लोळोनी ।
स्मरण भवानीचें करि भवानरावचि सदैव घोळोनी ॥ ५ ॥

श्रीमंत गरिब राजा भवानराव हि असा असावा हो ।
उत्साहें उद्योगें सकल प्रजांसह यशासि हा वाहो ॥ ६ ॥

राजे व्हा सकल प्रजा, राजा बोलें तसेंचि दल झाले ।
नवयुग अद्भुत रम्यचि प्रतिनिधिराज्यांत प्रकट कीं झालें ॥७॥

करुं औंधेशानुकरण, होऊं औंधेश-भक्त जन सारे ।
राजा प्रजाचि झाल्या ! द्वैताचें राहिल कुठें वारें ॥ ८ ॥

जग-मान्य जाहली हो ! ज्या राजाची सहस्रकर-भक्ती ।
तद्गुण-गानीं लागो कविची अभिजात कवनवरशक्ती ॥९॥

—पन्त पराडकर

# प्रभुवरपदाचा महिमा

( सुनीत- वृत्त- शिखरिणी )

सदा ऐषारामीं व्यसनिं विविधीं मग्न असुनी
   ममैश्वर्यं लुब्ध स्वजन सुहृदा भाजन जनीं
तयांच्या तंत्रानें कुपथचरणीं सेवि सहसा
   चुकें मी कर्तव्या प्रभुवरपदावाचुनि तसा

प्रभो! ऐश्वर्याचा खचित क्षणभंगूर जगतीं
   पसारा हा वाटे तुजविण जनां हो न सुगती
कुठें तें ऐश्वर्य स्वजनविरहाला न उपमा
   मला वाटे सारा प्रभुवरपदाचाच महिमा

कला, विद्या, लक्ष्मी सकल मिळतां जो न भुलला
   महात्मा तो ऐसा तव पद-रजांला न झुकला
अनाथांचा वाली प्रथित भुवनीं नाम तुजला
   हरी दैन्या, देई पदनत अनाथा सुख मला

×   ×   ×

सदा आपत्कालीं सदय प्रभु! तूं तारक मला ।
   तुझ्या वाचोनीया अवनितलिं या कोण मजला?

— धोंडोतनय

# श्रीसद्गुरु-स्तवन

( वृत्त – पृथ्वी )

गुरो! पतितपावना! तव कृपा असो मच्छिरीं
असे गुरुकृपा जगीं सफल जीवयात्रा तरी
भवाब्धिपतिता मला नच दुजी तराया तरी
गुरो ! मजसि उद्धरा बुडत मी जलाभीतरी १

घडे परिस आयसा विधिबळें जरी भेट हो
तरी त्वरित आयसीं मणिगुणें सुहेमत्व हो ।
न दे परि मणी कधीं परिसता तया आयसा
जगीं सुगुण सद्गुरू करि सुशिष्य तो आत्मसा २

गुरूस उपमेस हो बहु थिटा पयोधी महा
स्वयें प्रलयिं नासतो गुरुकृपा न नासे पहा
न हेमनग त्या कधीं जगिं तुळे दयासागरा !
कठोर अति तो असे जरि सुवर्ण अश्मा खरा ३

गुरूस उपमावया नच पुरे सुराका-पती
शशीस उपराग ये कधिं तया कळा लागती
न ये गुरुकृपेस या ग्रहण ना क्षयाला गती
अतैव गुरु त्या निशापति–परी गुरू बोलती ४

प्रपंचविपिनीं पशू भिवविती मला षड्रिपू
त्वरें अभय दे मला असिस तूं रिपूंचा रिपू
तसें तरुण कामिनी कनक नित्य मोही मना
मुमुक्षु म्हणती इतःपर नमो स्त्रिया कांचना ५

प्रपंचभर घे शिरीं निशिदिनीं परी ना घडे
क्षणैक तव भक्ति कीं भजन जें तुम्हां आवडे
असे जरि असें विटो न मज ती गुरू-माउली
पिता जरि विटे विटो, नच विटे कधीं माउली ६

कृपेस जन हा अपात्र परि हो तरी कायसा
प्रसाद तव सद्गुरो ! मणिपरीस त्या आयसा
तुरंत जरि नायसीं रुचिर हेमकांती जडे
सदैव परिसास त्या अघ जनीं स्वदोषें घडे ७

सख्या! चरणपंकजीं रत द्विरेफ मी सद्गुरो !
असो सतत मन्मनीं अवतमांश तो ना उरो
भवाब्धि–वडवानलातें हृदयास रंजीव कीं
पदांबु लव सिंचुनी करि मला चिरंजीव कीं ८

पिता मम गुरू, गुरूच जननी, गुरू बंधु कीं
सखा मम गुरू, गुरूच भगिनी, गुरू देव कीं
गुरूच धनद्रव्य कीं, गुरुनिवास माझें महा
गुरूच मम जीव कीं, गुरु ममैव सर्वस्व हा ९

अनंत कवि मी तुम्हां नमितसे सदा सद्गुरो !
तुम्हां पसरुनी कुरा पदर याचितों हें प्रभो !
असेल मम आयु तोंवरि अनंत जन्मांतरीं
गुरो! मज घडो निशीदिनिं पदाब्जसेवा करीं १०

—अ० य० देशपांडे

५

# कोकिलेस--

( वृत्त– स्रग्धरा )

गाई तूं गान येथें तरुवरिं बसुनी कोकिळे ! सुप्रभातीं
गाती गे ! अन्य पक्षी तुजविण परि ते व्यर्थ आम्हांस भाती
प्रत्यब्दीं या वसंतीं परिमल–बहलीं आम्रवृक्षीं तुझा तो
आम्राशीं जाहलेला अनुपम जगता मोद संयोग देतो १

आनंदें आक्रमीशी कतिपय दिन त्या आम्रवृक्षीं सुखानें
गावोनी तोषवोमी प्रियकर अपुला, विश्वही चूत गानें
देशी आजन्म ऐसा मुद तव जगता मूढ विश्वास येतो
जाशी जेव्हां त्यजोनी सहकर फसतो सूज्ञ विश्वासवें तो २

होवोनी माधवाचा अवसर ऋतु जों ग्रीष्म येतो क्रमानें
सांगातें माधवाच्या प्रियतम करिशी निर्गमा साभिमानें
होते लोकीं अवज्ञा चिरपरिचय हो घातकी हीच शिक्षा
द्याया लोकांस घेशी जणुं मज गमते वास अज्ञात दीक्षा ३

आपत्काळीं त्यजीना प्रियतम हृदयीं एकदां मानला जो
पाहोनी सत्कृती हो तव मनुज जगीं नित्य कां तो न लाजो
भावी वा ग्रीष्म तापा उमजुनि वरिशी योग्य या एक पन्था
किंवा ना दृष्ट जेथें प्रतिकुल स्थिति हो राहणें तेथ सन्तां ४

—अ० य० देशपांडे.

# भाव—चंपक

( जाति— मोहिनी )

भावसुमन वाही सु-मना औंधभूपतीला
मोदभरें अर्पि प्रभूतें नमुनि मस्तकाला ॥ ध्रु० ॥
उठुनि रोज प्रातःकाळीं ध्यान ईश्वराचें
मूळपीठिं जाणें, करणें स्तवन भास्कराचें
मातृपितृभक्ती हृदयीं, व्यसन ना कशाचें
साधि राहणी शोभे त्या उच्च विचाराला १
शिल्पकलाप्रेमी तैसा चतुर चित्रकार
शब्द अचुक मार्मिक वक्ता जणूं गोळिबार
गोड कीर्तनानें लाभे जना भक्तिसार
पूर्वजन्मिची पुण्याई प्रभू लाभण्याला २
सार्वजनिक कार्यालाही सदा सढळ हात
पूर्ण मग्न ज्याचें मन कीं प्रजापालनांत
कीर्तिगंध त्याचा पसरे, अखिल भारतांत
दुवा प्रजा देई मानी त्याच कमाईला ३
स्वर्ग सोडुनी अवतरली इथें कामधेनू
गगनपथा त्यजुनी आला जणूं दिव्य भानू
थकुनि जाय जिव्हा माझी, किती गुणा वानूं ?
पिता कोण दुसरा आहे सकल या प्रजेला ? ४
उंच उंच स्वर्गीं झळको कळस कांचनाचे
कीर्तिमंदिराचे तैसे आत्मवैभवाचे
सुगुण गान गावें कविंनीं राजघराण्याचें
दीर्घ आयु लाभो प्रभुतें करी प्रार्थनेला ५

—रा० ता० फडणीस

# द्रौपदीचा धांवा

( छन्द– ओवी )

केश कवळुनी वामकरें । म्हणे झणी चाल वो किंकरे ।
ऐशिया कुशब्द–कुठारें । हृदय माझें विंधिलें ॥ १ ॥

मस्तकीं ओपोनि गदा जाण । अंतःपुरींच घेता प्राण ।
तरी सौख्यें येतें मरण । ही आपदा कोण साही ? ॥ २ ॥

मज लागल्या बहुत कळा । येणें नोहेचि मी विव्हळा ।
हा अपमान आपुल्या डोळां । कोण पाहूं शकेल ? ॥ ३ ॥

द्रुपदापोटीं जन्मा न येतें । तरी तें फारचि बरवें होतें ।
ऐसा प्रसंग ओढवला मातें । कैसा आजि दुर्घट ॥ ४ ॥

म्यां उपजोनि पुरुषोत्तमा ! । दोहीं कुळीं लाविला काळिमा ।
अधमाहुनि मी अधमा । प्रारब्ध माझें ओखटें ॥ ५ ॥

मी जरि असतें दैवाची । तरी मजवरी या दुर्जनांची ।
सावुली पडती केवि साची ? । मी दैवहीना करंटी ॥ ६ ॥

सांडूनि माझा अभिमान । हे नरवीर पांचही जण ।
लिखित चित्रासमान । अधोवदनें बैसले ! ॥ ७ ॥

भीष्मादिकीं थोर वडिलें । यांहीं मन निष्ठुर केलें ।
म्हणूनिया मज आणिलें । ऐशा रीतीं सभेसी ॥ ८ ॥

बैसल्या राजयांच्या श्रेणी । त्यांमाजी मी उभी अधोवदनीं ।
पाठिराखा तुजवांचुनी । सांग कोण ये काळीं ? ॥ ९ ॥

आतां मज न धरवे धीरू । कंप सुटला अनिवारू ।
गळो पाहे पां शरीरू । प्राण जावो आतांची ॥ १० ॥

प्राण गेलियानंतर । दुष्टांहातीं हें कलेवर ।
सांपडलिया दुरिताचार । काय करिती नेणवे ॥ ११ ॥

यासाठीं दुभंगावी धरणी । मोदें धुमकीन याच क्षणीं ।
कृपाळु बा ! तूं चक्रपाणी ! । माझी विनवणी आयके ॥ १२ ॥

आतां तुज काय दावूं वदन । देहासहीत पंचप्राण ।
अदृश्य झालियावांचून । सौख्य कैंचें मजलागी ? ॥ १३ ॥

येई वो ! श्रीरंगे ! मायबहिणे ! । पाहीन पादांबुजें अधोवदनें ।
हीच आशा माझिया मनें । धरियली शेवटीं ॥ १४ ॥

त्वां येऊनि लवलाहीं । मातें भेटून परत जाई ।
याविण माझी अन्य कांहीं । आशा नाहीं राहिली ॥ १५ ॥

जाहलें तें बरवें झालें । पूर्वी विधीनें जे भाळीं लिहिलें ।
तें भोगूनियाच सारिलें । पाहिजे कीं निजांगें ॥ १६ ॥

तूं तरी दीनदयाळा ! । काय करिसी गा गोपाळा ! ।
माझिया संचिताचा सोहळा । पाहण्यातें त्वां यावें ॥ १७ ॥

तूं माझा पाठिराखा । हें ठावें असे सकळिकां ।
मी बोलोनियां तें का । दाखवावें तुजलागीं ? ॥ १८ ॥

याहून कोणतें वरिष्ठ । मजवीर पडावें संकट? ।
विचार करुनिया तूंचि श्रेष्ठ । बंधुराया ! पाहावें ॥ १९ ॥

दुष्टें घातला निरीस कर । देखोनि पांचांहिं त्यजिला धीर ।
आतां येवुनिया सत्वर । अभिमान थोर राखावा ॥ २० ॥

वाहतां जाहले रे कष्टी । त्वरें यावें बा जगजेठी ! ।
तुझ्या मायेची क्षणीं पेटी । उघडुनि दावी नीचातें ॥ २१ ॥

तूं सर्वां सर्वत्र असमी । परी अभाग्या न गमसी ।
गजेंद्राचिया आकांतासी । धावलासी लवलाहें ॥ २२ ॥

भक्त प्रल्हाद गांजिता तातें । स्तंभीं प्रकटुनि तुवां तेथें ।
वेगें वधुनि असुरातें । सुखी केलें बालका ॥ २३ ॥

ऐसा तुझा अगाध महिमा । कोण जाणे गा पुरुषोत्तमा! ।
भगिनीचिया येऊनि कामा । पूर्ण कामा करावें ॥ २४ ॥

केवुतां गेलासी अनंता ! । कां न वाहसी माझी चिंता ।
दुर्जनें मज अपमानितां । रुचे कैचें तुजलागीं ? ॥ २५ ॥

सहस्र व्याघ्रांमाजी मी हरिणी । तिष्ठें सभारूप काननीं ।
धीर धरावा अंतःकरणीं । केवि आतां सांग पा ? ॥ २६ ॥

ऊर माझा उलो पाहे । किती धाय मोकलूं पाहे ।
अजुनी कां करुणा न ये । दावी पाय सत्वरीं ॥ २७ ॥

किती आळवावें तुजला? । कंठशोष फारचि झाला ।
कोण्या गुणें माझिया बोला । अंगिकार न करिसी? ॥ २८ ॥

माझें मांडिलें विंदान । काय पाहतोसि निदान ।
आतांच यावें बा ! धाउन । माझा मान राखावया ॥ २९ ॥

नेणें माझ्या कर्माची गती । म्हणुनि धांवा न पडे श्रुतीं ।
या कारणेंसि बा श्रीपती ! । तूं न येशी धावुनी ॥ ३० ॥

ऐसा ऐकोनिया धांवा । बहू कळवळा आला दयार्णवा ।
मनोवेगें येउनि तेधवां । राखिला मान सतीचा ॥ ३१ ॥

(द्रुतवि०) पितपटें हरिनें सति झांकिली । पुनरपी अधमें न विलोकिली ।
घनिं लपून जशी चपला वसे । हरि दयाघन हा लपवीतसे ॥३२॥

—श्री० बा० येरगट्टीकर

# वृद्ध-कठ्युद्गार

( वृत्त- इंद्रवज्रा )

संसारतापा नच साहूनीया
आलों इथें सांडुनि मोहमाया
पर्णें कशीं मर्मर वाजतात
शांती मिळे लेश न या वनांत  १

झोंबे किती हा तरि गार वारा
नाहीं ममांगीं उरला उबारा
साहूं किती बुर्बुर पावसाची
गेली लयाला धृति मन्मनाची  २

जेथें तिथें कर्दम होय सारा
कोठें मिळेना लवही निवारा
वस्त्रें भिजोनी बहु चिंब झालीं
मज्जीविताशा सगळी निमाली  ३

येथील देवालय हें शिवाचें
झालें अती जीर्ण बहू दिसांचें
येथें सदा वास घडे वृकांचा
ते जीव घेती मृगशावकांचा  ४

त्यां कैंचि घोर स्थलिं या वसावें ?
वाटे मला येथुनि शीघ्र जावें

## भावलेखा

अस्तास गेला परि तो तमारी
जाऊं कुठें या निबिडांधकारीं ५

पायीं किती हे रुतती सराटे
दुःखातिरेकें मम कंठ दाटे
जाया वनीं बुद्धि कशी उदेली
बुद्ध्याच मद्दुःस्थिति म्यांच केली ६

होईन मी खाद्य निशाचरांना
व्याघ्रास वा निर्दय त्या वृकांना
सजीव ते घेतिल याच कालीं
या संकटीं होईल कोण वाली ७

चिंतीत ऐसा असतां समोर
तों देखिला म्यां वटवृक्ष थोर
गेलों तयासन्निध सावकाश
आधार भारी गमला जिवास ८

बैसूनि तेथें क्रमिली निशा ती
अर्पूनि रामीं मम चित्तवृत्ती
श्रीरामरूपीं जडली समाधी
आतां कशाची मजला उपाधी ९

स्वानंद-सिंधूंत सुखें बुडालों
आत्मस्वरूपींच विलीन झालों
आतां मला होय सदा दिवाळी
देहाभिमानाप्रति कोण पाळी ? १०

—श्री० बा० येरगट्टीकर

# गोपींची आत्माहुति

( वृत्त– शार्दूलविक्रीडित )

कालिंदी–तटिनी–तटीं मधुवनीं येऊनि गोपांगना
गीतें गाऊनि बाहती मृदुरवें प्रेमें जगन्मोहना
तों ये माधव राधिकेसह तिथें त्या दिव्य राकादिनीं
रासक्रीडनिं कंठिली बहु मुदें त्यांहीं शरद्यामिनी १
नाना केलि करुनिया हरिसवें त्या कोमला श्रांतल्या
आत्माक्षीं अरुणांकुरा प्रसवल्या, धाल्या परी लाजल्या
कांताच्या स्मरतांच धाक अवघ्या संफुल्ल वल्ली भल्या
झाल्या कंपित त्या, प्रभावसमयीं अत्यंत कोमेजल्या २
आणाया जल कुंभ घेउनि कटीं त्या सुंदरा पातल्या
गेल्या वेधुनि मानसीं हरिगुणीं, चिद्रूपिं त्या रंगल्या
कालिंदीनिकटीं हरी मधुवनीं तैं वाजवी मोहरी
तीचा मंजुल नाद मोहुनि मना तद्देहभाना हरी ३
गोपी त्या अबला असूनि सबला झाल्या असें पाहुनी
केलें जर्जर फार निर्दयपणें कांतें तयां ताडुनी
तत्रापी तिळमात्र त्या न खचल्या देऊनि आत्माहुती
गेल्या संसृतिपाश तोडुनि क्षणीं कैवल्यधामाप्रती ४
श्रीमद्वामनपंडितादि कविंनीं केलें जसें वर्णन
मींही त्यापरि वर्णिलें, प्रभुवरा यावा तया रोष न
हातीं घेउनि आद्य थोर कविची ही शब्दमुक्तावली
गोपीमानस–राजहंस–हरिला प्रेमोत्कटें वाहिली ५

—श्री० वा० येरगट्टीकर

# उपदेशसुधा

## पद १ लें.

( राग– हमीर त्रिताल. )

प्रभुपदां स्मरतां हरि आपदा । रामनामीं मन राहो सदा ।। ध्रु० ।।
सहज सुलभ पथ हा धरि समजुनी । सद्‌गुरुवचनीं दक्ष अनुदिनीं ।
तरी तरशिल वरशिल मुक्तिपदा सुखदा ॥ १ ॥

## पद २ रें.

( राग– गौडसारंग, एकताल, मध्यलय. )

मधुर सत्य बोलावें, जनमनहर स्वल्पाक्षर गूढार्थपर हितकर ।
श्रवणें बुध डोलावे ।। ध्रु० ॥
स्त्री मृगया द्यूत पान । यांविषयीं उदासीन । स्नान ध्यान सुरपूजन ।
गुरुचरणीं मन स्थीर करावें ॥ १ ॥

## पद ३ रें.

( राग– भूप, एकताल, मध्यलय. )

संसार निःसारसा, साधुसंगें हो ठसा ॥ धृ० ॥
सेवुनि पद श्रीहरिचें, जेंवि भृंग सारसा, लावुनिया दृढ हें मन
रक्षिल तरि हा भरंवसा ॥ १ ॥

## पद ४ थें.

( राग– पूरिया, त्रिताल. )

स्थिर मनें करि आसना, सतत । उपासना शांतचित्त ईशभक्त
योगयुक्त करि साधना ॥ धृ० ॥
तव गुण गायन करितां उन्मन, अष्टभाव उपजावे,
जावे विलया षड्रिपु सदया, विनति मम पुरवि वासना ॥ १ ॥

—अनंत मनोहर

# आशा

( जाति– बालानन्द )

आशेवरतीं जग चाले    आनन्दें भरुनी गेलें
रुग्ण पडे शय्येवरतीं    पितरां वाटे बहु भीती
शंका येती मनिं नाना    काय होय हें कळेचिना
डॉक्टर, वैद्य तसे आले    देती औषध त्यास भले
लोकहि जमले
कोणी वदले
भूत लागलें
गंडे दोरे आणविले    जनहृदयीं आशा खेळे ॥ १ ॥
बालक म्हणतें मी जगणार्    देशोद्धारास्तव झटणार्
मृत्यूच्या मांडीवर पहुडे    हासे परि लाडेंकोडें
पाश यमानें फेकियले    आशेनें बालक जगलें
देहकष्ट किति
आप्तहि करिती
बहुत श्रमती
कारण आशा ही वेडी    जीवनांत आणी गोडी ॥ २ ॥
आशा जगतीं चिन्मूर्ती    आशा सकलां चिच्छक्ती
आशेवर जीवन चाले    आशेनें जीवन खुललें
दुःखहि अवघे जन सहती    आशा नान्दे भूवरती
दुःखी जीवन
हो नन्दनवन
आनन्दें जन
आयुष्यातें आक्रमती    स्वर्गतुल्य आशेवरतीं ॥ ३ ॥

–शं० चिं० केळकर

# महात्म्याचें माहात्म्य

( चाल – गोकुळिचा कान्हा कोणी ... )

हिंदभूमिचा जीवात्मा, पाहुं या चला हो
भरतभूमिचा पुण्यात्मा, पाहुं या, चला हो ॥ ध्रु० ॥
टकळीवर काढी सूत्र
अंगिं कधिं घाली न वस्त्र
असा हिंदभूप्रियपुत्र । पाहुं या चला हो १
असुनि शांततेचा पुतळा
भय वाटे ज्याचें काळा
एक वेळ जाउनि डोळां । पाहुं या चला हो २
मार्ग दावितो सकळांचा
उपदेशें फोडिलि वाचा
शूर वीर हिंदगड्यांचा । जनक नाहिं काय हो ३
करीं धरुन दुबळा वर्ग
दावितसे तें सन्मार्ग
घावु गेनु पाही स्वर्ग । स्फूर्तिनें किं नाहिं हो ४
सनातनी शिक्षित जनहो !
धर्मशास्त्र तव शोधा हो
महात्माजि फोडिति टाहो । हरिजनार्थ नाऽहो ५
गनिम कवी बोले वाचें
सोशि घाव जो टाकीचे
ये महात्म्य त्यासी साचें । इतर जनां नाहिं हो ६

–नवसरलाल कलाल

## गुलाबास—

( गुलाबाचें नैसर्गिक व कृत्रिम फूल पाहून सुचलेले विचार )

( जाति— मनमोहन. )

कां करिशी स्पर्धा कृत्रिम सुमना ! उतरेल तुझा नूर
ही उषा पाहोनि दूती
हर्षली भू सुप्रभातीं
तों दिनराजाचें स्वागत करण्या गुलाब हा आतूर
हालवी शाखासुमांना
अंतरीं ये भाव नाना
कीं नसानसांतुनि नवोत्साह हा भरला पुरेपूर

भावलेखा

मृदुल मोहक पाकळीतें
वायुलहरी हालवीते
कां मधें मुरडिशी सर्वांगा सोसेना वायुपूर ?

पूर्ण चैतन्यें विनटलें
पुष्प ऐसें विकसवीलें
तव अगाध लीला प्रभो ! वानुं किति होय मनीं मी चूर

पुष्प हालें हृदय डोले
सौरभानें विश्व भरलें
या सुरम्य समयीं पळुनी जाई निर्जिव सुमना ! दूर

मानवाचें बाहुलें हें
तुल्य त्यासी होउं पाहे
कां वृथाच स्पर्धा करिशी तूं ? अभिमान गमे भरपूर

जीवनाची ज्योत तेजें
तेथ पूर्णत्वें विराजे
मानवा ! कशास्तव बरोबरीची व्यर्थ तुला हुरहूर ?

मानवी सारी कुशलता
पूर्ण अन्तीं विफल होतां
त्या ईशकृतीचे मानवहृदयीं उठती कोमल सूर

औंध. —कु० अक्कासाहेब पंत

# मार्गप्रतीक्षा

ये, ये, तूं मधुहासिनी ! मजकडे ये, भेट आनन्दुनी
हृद्देवी ! हृदयैकमन्दिर तुझें, ये तूं तरी धाऊनी
तूं येणार त्वरें म्हणूनि बसलों मी येथ विश्वासुनी
कां मातें सफलाश तूं न करिसी संमोहने ! कामिनी ?
डोळे लावुनि त्वत्पथीं सुमधुरे ! येथें अहर्यामिनी—
बैसूं कोठवरी ? हताशहृदया पाही तुझ्यावांचुनी—
ऐशी कोण सखे ! जगांत वसते कारुण्यकल्लोलिनी ?
नैराश्यीं प्रणयाकुला मज गडे ! तूं राहसी सोडुनी ?
तूझा नूपुरनाद-कंकणध्वनी येईल ऐकावया
कांहीं सुन्दर गायनें परिसुनी लागेन मी गावया
त्वत्कण्ठावरि हें करद्वय सुखें, ठेवूनिया सन्तत
ओष्ठीं ठेवुनि ओष्ठ मंजुवचने ! सप्रेम आलिंगित

  

— ही आशा हृदयीं, अधीर मन हें नेत्रांत अश्रू भरी
वाग्देवी ! हृदयैकदेवि ! तव मी मार्गप्रतीक्षा करी !

—वासुदेव

# मोटारवाल्यास --

( चाल-- फुलें वेलीचीं० )

[ 'सर्व्हिस्' च्या मोटारींतून प्रवास करणाऱ्या कुणा प्रवाशाचे उद्गार ]

पुरे चपळाई । कां इतकी तुजला घाई ? ॥ ध्रु० ॥
जरा दमानें चालव गाडी । पळतुं नको तिस 'ब्रेका' ओढी
ना तरि मातें पायीं धाडीं । ऐक रे भाई ! १
चाल कशाला असली भलती 'अतीच तेथें होई माती ! '
कर तरि वेगहि थोडा कमती । दया कां नाहीं ? २
भलत्या वेगें फिरतें डोकें । मागें पुढतीं आपटे धडके
वाटे फुटुनी जातें मडकें । दया तुज नाहीं ! ३
फडफड करितें तिकडे 'इंजन' । धडधड करितें इकडे मम मन
इकडे तिकडे गोते होऊन । घाबरुनि जाई ! ४
हाय ! हाय ! हे बसती गचके । डोळ्यांपुढतीं तारा चमके !
हृदयहि गेलें वितळुनि धाकें । पाणी होई ! ५
घरीं बायकोपोरें असती । भारहि त्यांचा माझ्यावरतीं !
कोण कुणाला पुसेल मागुतिं ? । मृत्यु जरि येई ! ६
मिळती महिना रुपये पंध्रा । पोट भागतां वाजति बारा !
मग त्यांतुनि का उरेल कचरा ? । कोणी नाहीं ! ७
पैसा नाहीं, विमा न भरला । शिल्लक कोठें ठेवायाला ?
माझ्या मागें कुटुंबियांला । मरणच राही ! ८
'कॉंपीटीशिन' करुन परांशीं । मुकविसि आम्हां मात्र जिवांशीं
गाडी उलटुनि जाशिल फाशीं । खेळ तव होई ! ९
हात आवरी मित्रा ! माझ्या । भरल्या मोटारीच्या राजा !
तुझ्याच हातीं माना आमुच्या । अंत न पाहीं ! १०

--वासुदेव



श्री. वासुदेव.



श्री. ना. वि. गोलिवडेकर



श्री॰ अनन्त मनोहर.



श्री॰ मा॰ कृ॰ दाभाडे॰

औंध स्टेट प्रेस.

# भावदर्शन

( वृत्त- पाण्डव )

पाहिलें मार्गी मला तूं    चाप कां हें सज्जिलें ?
एकट्याला गाठुनिया    नेत्रबाणें विद्धिलें !

× × ×

कंकणाच्या मंजुनादें    जीव झाला बावरा
मी फिरोनी पाहिलें तों    नेत्र कां तूं रोखिले ?

ओढुनी आकर्ण चापा    सायकातें सोडिलें
जाहलों व्याकूळ तेणें    अन्तरा तूं भेदिलें

लोचनींच्या सान्द्रभावें    बद्ध झालों विस्मयें
त्वन्मुखींच्या हास्यलास्यें    वेड कैसें लाविलें !

## भावलेखा

कुन्तलाच्या मत्तगन्धें   चित्त माझें धुन्दलें
फेंकिलसी तूं कटाक्षा   भ्रान्तही तें जाहलें !

× × ×

शैशवीं तुझ्या कितीदां   खेळवीलें मी तुला
त्या टपोऱ्या लोचनांनीं   आज मातें मोहिलें !
पाठ माझी तूं कितीदां   सोडिली ना तेधवां
आजही त्वन्नेत्र मुग्धे !   कां म्हणोनि धावले ?
लाजरीं अन् स्नेहपूर्णें   लोचनें तूं रोखिसी
हांसशी तूं सानुरागें   चित्त हो वेडें खुळें
फेंकिलासी तीक्ष्ण भाला   काळजाला तो भिडे
हाय ! तेव्हांपासूनीया   जीव माझा ना झुरे ?

× × ×

तूं कुबेराची सुकन्या   या जगीं कंगाल मी
काय बाणा हा फकीरी   आज तूंतें मोहवी ?
प्रेमपाशीं या जिवाला   कासया तूं बांधिलें ?
आस कां खोटी अशी ही   लावुनी वेडाविसी ?
वंचना भोळ्या जिवाची   कां रुचे गे मोहिनी ?
आवरी त्वन्मोहपाशा   मोहिनी घे काढुनी !

औंध, ता. २३–६–३४   —शशाङ्क

# सभोंवार

( जाति– मुद्रिका )

मानसीं नवोनव उद्भवती कल्पना
परि कुणापुढें मांडाया ना धीर होतसे मना १
उघडितां ओष्ठसंपुटा जरा बोलण्या
भेसूर हांसुनी देती मानसा अमित डागण्या २
आत्मीय जिव्हाळा कुठुन येइ त्या जनां
अपसांत करुनि टीकेला उगवती सूडभावना ३
ना प्रेमळतेचा शब्द हृदयिं वसतसे
परि परुषभाषणें सारीं उधळिती मजवरी कसे ! ४
' हा मूर्ख ' तसा ' तो शिष्टहि पाजी असे '
परनिंदा करिती ऐसी, रंजीस जीव येतसे ५
ना कधीं मुखांतुन सद्विचार उमटती
काढिती उणें सर्वांचें टोमणे सदा मारिती ६
प्रोत्साहन शाब्दिक तेंहि भाग्य ना मला
तशि सहानुभूती माझ्या वांट्यास न ये आजला ७
स्तब्धता बघुनि मम वदती कुत्सितपणें
' आंतल्या गांठिचा आहे ' जळफळती द्वेपाग्निनें ८
नवनवोन्मेषिणी रम्य कल्पना मनीं
किती धुमाकूळ घालोनी वर येइ पुन्हा उसळुनी ९
जोंवरी पसरलीं सभोंवार हीं भुतें
तोंवरी हृदय उघडाया काव्याविण ना स्थान तें १०

औंध ता. ७–४–३२ —शशाङ्क

# शुक्राची चांदणी

( जाति– चन्द्रकान्त )

नीळाकाशीं नभोमंदिरीं कोण देवता ही ?
मन्द पाझरे तेज भूवरी फुलुनी लवलाहीं

कां रजनीच्या कृष्ण कलापीं पुष्प खोवियेलें ?
प्रकाश नोहे मधुगन्धें हें भूतल दरवळलें

रजनीच्या कां मुखचंद्रावर तिलक कुंकुमाचा
भालप्रांगणिं विराजतो हा नवत्या बहराचा

काय निशाराज्ञीच्या विलसे खळी कपोलांची
दिपवी तेजें नेत्र, बिन्दली कां भालावरची ?

तमोदेवता गुम्फित असतां नव–मौक्तिकमाला
जणूं गुंफिली तेजोराणी विसरुनि भानाला

नभोमानसीं राजहंस कां विहार करित असे
विधुकमळांतिल नक्षत्रांचा पराग सेवितसे

कृष्णरुक्मिणी खेळत होते प्रणयाची केळी
निखळुन पडला तेजोराशी कौस्तुभ त्या वेळीं

तेव्हांपासून हृदयावरचा मणी कौस्तुभाचा
मार्ग धुंडितो वेड्यावाणी नभःप्रदेशाचा

कुण्या नृपाची लेक चमकते नभोमण्डळांत
सख्या तारका जमवुन संगें दंग खेळण्यांत

विधिमदनें विधुहृदयीं का हा बाण मारिलासे ?
झुरत तिच्या प्राप्तीस्तव गगनीं निशानाथ भासे

गगन–मण्डलीं कोण बालिका ऐटदार बसुनी
अबलक घोडा फेकित आली ज्वानींतिल तरुणी?

सायंतनिं अभिसारिका इथें नटुनि काय आली?
प्रियकर–भेटीस्तव उत्सुक ही गमते या कालीं

स्वर्युवतीच्या सौन्दर्याची मूर्तिमन्त कांती
भूलोकींच्या पावित्र्याची ऊर्जस्वल मूर्ती

हिरेमाणिके कातर वेळीं भानु नभीं उधळी
कोहिनुर हा तेजशलाका फेंकितसे खालीं

चंदेरी दर्यात ठेविलें दीपगृहा रचुनी
अमर वल्हविति नक्षत्रांच्या नौका सजवूनी

पैलथडीला शशाङ्कराणा ऐलथडीं बाला
मधून वाहे स्वर्गंगा ही भरून दुथडीला

स्वर्लोकींची कुणी अप्सरा नन्दनवनलतिका
गगनपटल हें दूर करूनी निरखी भूलोका ?

औंध.

—शशाङ्क

# प्रार्थना

[ जाति– मनमोहन ]

हे स्फूर्तिदेवते ! तव तेजाची ज्योत्स्ना दे उधळून्
दास्यपङ्कीं माय रुतली
हिन्दजनता दीन झाली
जाणीव तिजसि दे महन्मङ्गले ! अन्जन नयनिं भरून्
पारतन्त्र्यें जखडलेले
आत्मतेजा पूर्ण मुकले
चैतन्य तयांचें स्फुल्लिङ्गित करि तेज तुझें विखरून्
नष्ट झालें वीर्य कैसें ?
राष्ट्रभक्ती लोपलीसे
नवजीवन देई यशोदेवते ! तेजसुधा पाजून्
विविध जाती भिन्न रीति
श्रेष्ठता प्रस्थापिताती
वल्गना उच्च अन् नीचत्वाच्या टाकी शान्त करून्
सूज्ञही स्वार्थान्ध झाले
मर्द अवघे भ्याड बनले
निद्रिस्त बान्धवां कर जागे रणशिङ्ग तुझें फूंकून्
दास्य तें निर्दाळुनीया
संघशक्ती निर्मुनीया
स्वातन्त्र्यलाभ होउं दे, सङ्गरीं जीव मुदें अर्पुन्
दुरित हरुनी तिमिर जाया
दैन्य सरुनी सौख्य याया
या परदास्याच्या लोहशृङ्खला टाक क्षणीं तोडून्

औन्ध १८-४-३०

— शशाङ्क

# ‘ सागरीं लोटिली नाव कुणीं ? ’

[ जाति– प्रणयप्रभा ]

ध्वज उंच शिडावरि फडकवुनी
सागरीं लोटिली नाव कुणीं ?

घन तम पसरे चोहिंकडोनी
मेघ भिवविती भीषण गर्जुनि
चपला चमके त्यांत मधूनी
वर्षति जलधारा वरुनी
सागरीं लोटिली नाव कुणीं ? १

वेगें धांवे पवन भरारुनि
खवळे सिन्धू ये फेसाळुनि
ताण्डव–नृत्यीं जाई रङ्गुनि
वेळ भयानक ही असुनी
सागरीं लोटिली नाव कुणीं ? २

लाटा उसळुनि नभास भिडती
सैरावैरा जलचर धांवति
नाव झोकते खालीं वरती
बिकट मार्ग ऐसा असुनी
सागरीं लोटिली नाव कुणीं ? ३

छिद्र पाडिते स्वार्थी जनता
होत सज्ज ही स्वकीय घाता
अथाङ्ग सागर थरकवि चित्ता
म्हणूनि काय वदतां भिउनी
सागरीं लोटिली नाव कुणीं ? ४

पूर्ण विरागी नाविक वरतीं
वल्ही मारुनी तुज दाखविती
राष्ट्रकारणीं सोडी भीती
वाफ नको दवडूं वदुनी
सागरीं लोटिली नाव कुणीं ? ५

कर्णधार हा दिव्य बैसला
नौका न्याया परतीराला
मार्ग दाखवी अज्ञ जगाला
जागृत होउनि बघ नयनीं
सागरीं लोटिली नाव कुणीं ? ६

औन्ध, १५-१-३१ --शशाङ्क